# ग्रंथमाला

मासिकपुस्तकांत छापलेलें प्रकरण.

# आचार्य-परिषद्.

दत्तात्रेय कृष्ण दामले,

आत्मशिक्षण पुस्तकाचे कर्ते

यांनीं लिहिलें.

कोल्हापूर :— 'श्रीसमर्थप्रसाद' छा० छा०.



किंमत ८।१२, ट० हां० ८।१.

# ग्रंथमाला




मासिकपुस्तकांत छापलेलें प्रकरण.

# आचार्य-परिषद्.

दत्तात्रेय कृष्ण दामले,

आत्मशिक्षण पुस्तकाचे कर्ते

यांनीं लिहिलें.

तें

कोल्हापूरः—'श्रीसमर्थप्रसाद' छा० छा०.



किंमत ८।२, ट० हां० ८।.

# समर्पण.

सुस्वभाव, सामर्थ्य आणि शहाणपण यांपैकीं माझ्या सुकृतांशानुसार जें थोडें मला लाभलें, तें सर्व ज्यांचें आहे, जे माझे आद्यगुरु असल्यामुळें मला सदैव देवस्थानीं आहेत, कांहींही केलें तरी ज्यांच्या उपकार-ऋणांतून उत्तीर्ण होणें अशक्य आहे व प्रेमास्तव, ज्यांच्या संतोषा-प्रमाणें पुष्कळ करूनही, तें ऋण कदापि नि:शेष न होवो असें वाटतें, भोग आणि ऐश्वर्य स्वत: यथेच्छ संपादून त्यांविषयीं केवळ सुखावह तृप्ति आणि समाधान ज्यांनीं मला आयतीं दिलीं, त्या माझ्या परम प्रिय आणि परम पूज्य पित्याच्या चरणीं ही अल्प सेवा अत्यंत भक्तिपूर्वक नम्रभावानें समर्पण केली आहे.

# प्रस्तावना.

भरतवर्षांतील संपूर्ण प्रजेच्या कल्याणाविषयीं जे अतिशय काळजी वाहतात, अशा आमच्या परमश्रेष्ठ आणि वंद्य आचार्यांच्या एका सभेंत आमच्या उन्नतीसंबंधानें जी चर्चा झाली व त्यानंतर जे निर्बंध ठरविण्यांत आले, त्यांपैकीं प्रस्तुत लेखकाला दुरून जितकें ऐकूं आलें व ऐकिलें, त्यांपैकीं यथामति जितकें समजलें, तेवढें त्याच्याप्रमाणेंच कदाचित् आणखी कोणाच्या उपयोगीं पडेल या उद्देशानें संक्षेपानें लिहून ठेविलें आहे व प्रसिद्धही केलें आहे. आचार्यांनीं प्रस्तुत वर्तननियामक निर्बंध वर्तमान लोकस्थितीला अनुसरून केले आहेत. तेव्हां लोकांस ते योग्य प्रकारानें समजावून देण्याची व्यवस्था त्यांजकडून होत असलीच पाहिजे. कारण, प्रजाजन त्यांचे शिष्य आहेत व त्यांच्या उद्धाराची ममत्वामुळें त्यांस सर्वस्वी चिंता आहे. आतां आचार्य जर समर्थ आहेत आणि भारतीयांविषयीं जर त्यांचें अत्यंत प्रेम आहे, तर हिंदु प्रजेची अशी शारीरिक, मानसिक, आणि औद्योगिक, अवनति कां झाली? त्यांनीं वेळींच दुर्दशेचा प्रतीकार करून, आपल्या लेंकराचें रक्षण कां केलें नाहीं? अशी कोणाच्या मनांत शंका येईल. परंतु आमच्या अल्पमतीकडे पाहतां असा प्रश्न आह्मी उत्पन्न करणें ह्मणजे आचार्यांच्या तपोबलाचा आणि त्यांच्या ज्ञानाचा उपमर्द करण्यासारखें होय. तसेंच भगवदिच्छे-चाही अवमान करण्यासारखें तें होईल. शिवाय आचार्यांनीं काळजी घेतल्यास आणि यत्न केल्यास पापाचरणाकडे प्रजेच्या मनाची प्रवृत्तिच होऊं नये व होणार नाहीं. हें खरें आहे व त्यामुळें शक्तीचा, बुद्धीचा आणि पराक्रमाचा ऱ्हास होऊं नये, हेंही खरें आहे; तथापि आपल्या दुष्कर्माचें हें दुर्दशारूप योग्य फल असलें पाहिजे असा समंजस लोकांनीं आपल्या मनाशीं अंमळ लाजून विचार करावयाला नको काय? आणि वेडेपणानें दोषाचें सर्व ओझें दुसऱ्याच्या शिरीं न लादतां, त्यांतून आपला वांटा लोकांनीं उचलावयास नको काय? प्रभूचें साहाय्य घेऊन आचार्य

आपलें लोककल्याणाचें कर्तव्य करितात व त्यामुळें त्यांना त्यांत यश येतें. तसेंच औत्सुक्य, स्वाभिमान, गुरुभक्ति, प्रयत्न, इत्यादि गुणांच्या द्वारें लोकांचेंही त्यांस साहाय्य मिळणें अवश्यक आहे. त्यावांचून कार्यसिद्धि व्हावयाची नाहीं. हें लोकांचें कर्तव्य लोकांनींही विसरतां कामा नये. सारी जबाबदारी समर्थांच्या अंगावर लोटून त्यांस स्वस्थ राहतां येत नाहीं. लोकांच्या अनुयायीपणाच्या सुलभ कर्तव्यांत त्यांजकडून उपेक्षा होऊं लागल्यास आचार्य कितीही कार्यदक्ष आणि कृपाळू असले तरी राष्ट्रीय कार्यांत त्यांस पूर्ण यश येणार नाहीं, हें लोकांनींही ध्यानांत ठेविलें पाहिजे. दैत्यांच्या त्रासानें प्रजा अतिशय त्रस्त होऊन ' त्राहि, त्राहि ' असा कळवळून आक्रोश करूं लागेपर्यंत ह्मणजे समाजाच्य मनाचें आणि त्याबरोबर अर्थात् त्याच्या शरीराचें आनुकूल्य घडेपर्यंत भगवंतांनींही भूभारहरणार्थ मत्स्यादि अवतार घेतले नाहींत. तसेंच गोवर्धन पर्वत जरी श्रीकृष्णांनीं स्वत:च्या करांगुलीवर धारण केला होता तथापि बालगोपालांच्या काटक्यांच्या धीराव्याचीही त्या कार्यास गरज होती असें दिसतें. या कथानकांतून उत्कृष्ट ऐतिहासिक तत्वें ग्रथित करून ठेविलीं आहेत. त्यांवरून नायक आणि जनता या उभयतांचेंही समाजोन्नतिरूप महत्कार्यास सारखें साहाय्य पाहिजे असतें हें उघड दिसून येतें. आचार्य सुज्ञ आहेत, तेव्हां ते आपलें कर्तव्य जाणूनच आहेत. लोकांनीं मात्र आपलें कर्तव्य न विसरण्याविषयीं खबरदारी बाळगिली पाहिजे.

परंतु कार्यसिद्धीसाठीं अवश्यक असलेल्या कर्तव्याची निदान थोडीशी जोखीम याप्रमाणें लोकांनीं आपल्या डोईवर घेतली पाहिजे, हा अभिप्राय कृपाळू आचार्यांस मान्य नाहीं. ते आपल्या अजाण प्रजेवर कोणत्याही जड जोखमीचें ओझें घालण्यास खुष नसून, राष्ट्रीय सुधारणेचा सर्व भार आपल्या खांद्यावर सर्वकाल वाहण्यास ते संतोषानें तयार आहेत. लोकांनीं कर्तव्यशील व्हावें आणि आचार्यांच्या उपदेशाला अनुसरून वर्तावें, असें त्यांस वाटावें हेंच मुळीं आपलें कर्तव्य होय असें आचार्य मानितात. आणि तें आपणाकडून बरोबर बजाविलें गेलें ह्मणजे साहजिकच लोकांचें कर्तव्य

त्यांस कळूं लागेल व त्याप्रमाणें त्यांजकडून वर्तनही घडूं लागेल असें त्यांचें मत आहे. लोकांचें कर्तव्य साधावें हेंच प्रथम आचार्यांचें कर्तव्य; तें यथास्थित घडलें ह्मणजे लोकांना कर्तव्यतत्पर करण्यास कोणी कांहीं निराळें करावयास पाहिजे असें नाहीं. तसेंच तें यथास्थित घडल्यानंतर लोक आपोआप श्रद्धावान्, समंजस, आणि उद्योगवादी झाल्यावांचून राहतील असेंही कधीं होणार नाहीं. तेव्हां सर्वांच्या सर्व कर्तव्यांचा बोजा अखेरीस आपणावर पडत असून, कालाच्या अंतापर्यंत तो संतोषानें सांभाळण्यास आपण तयार आहों, असा आचार्यांचा निश्चित अभिप्राय आहे व या त्यांच्या स्वजनवात्सल्याबद्दल आपण लोकांनीं त्यांचे किती उपकार मानावे आणि त्यांतून उतराई कसें व्हावें, हें ठरविणें खरोखर कठीण आहे.

हें जर खरें आहे, आपापल्या कर्तव्यांत लोकांना तत्पर ठेवून देशोन्नतीचें महत्कार्य साधावें हेंच जर आचार्यांचें मुख्य कर्तव्य आहे, व तें यथासांग तडीस लावण्याकरितां पाहिजे असलेलें सामर्थ्यही जर प्रभूच्या कृपेनें त्यांजपाशीं आहे, तर भरतभूमीचें पूर्ववैभव कसें मावळलें? भारतीयांचें उग्र तेज आणि पराक्रम कोठें गेला? त्यांच्या ज्ञानाचें काय झालें? त्यांचें तें सुखमय साम्राज्य कां लोपलें? लोपलें हें कार्य स्पष्ट आहे तेव्हां त्याचें कांहीं तरी कारण असलेंच पाहिजे. या अनिष्ट कार्याचा दोष कोणाकडेच नाहीं, ह्मणजे त्याचें कारण लोकांच्या अन्यथा वर्तनामुळें अथवा आचार्यांच्या दौर्बल्यामुळें अथवा उपेक्षेमुळें उत्पन्न झालेलें नाहीं. तर उपकारक विश्वधर्माला अनुसरून कालवशात् उदय पावणाऱ्या एका स्वतंत्र कारणामुळेंच वस्तुतः आचार्यांच्या तेजाची आणि प्रजेच्या प्राणाची हानि झाली आहे, असा योगनिष्ठ आचार्यांचा अभिप्राय आहे. भरतीनंतर जशी समुद्राला ओहोट लागते, यौवनभरानंतर जसा मरणांत लय पावणाऱ्या ऱ्हासकारक जरेला आरंभ होतो, रखरखींत निखाऱ्यांतून काढून थंड हवेंत ठेविलेला पदार्थ जसा कालावधीनें हवेसारखा थंड होतो, किंवा, ज्योतिषशास्त्रज्ञांच्या मताप्रमाणें, अमित तेजाला प्रसवणारा आमचा रविगोलही एकेकालीं, केवळ उष्णतेच्या उत्सर्गामुळेंच जसा निस्तेज आणि अनुष्ण

होईल, त्याचप्रमाणें राष्ट्रीय प्राणशक्तीलाही उत्कर्षापकर्ष आहे, राष्ट्रीय तेजालाही व्यसनोदय आहे. राष्ट्र माणसांचेंच बनलेलें असल्यामुळें त्यासही माणसाप्रमाणेंच आयुष्य आहे, आणि माणसाच्या आयुष्याचें नियम त्यासही लागू आहेत. प्रवाशाला आपला थकलेला घोडा जसा पुढल्या मुक्कामीं बदलावा लागतो, मनाप्रमाणें वागण्याचें सामर्थ्य जरेनें जर्जर झालेल्या तनूंतून गेलें ह्मणजे जीवालाही जशी जीर्ण काया ठेवून नवींत आरंभीं विश्रांति घ्यावी लागते, त्याप्रमाणेंच राष्ट्रीय चैतन्यालाही, परिस्थितिरूप देहाला धरून आपली पराकाष्ठा केल्यानंतर, आपल्या उत्कर्ष पावलेल्या स्थितीप्रमाणें अधिक काम करण्याकरितां, तिला अनुरूप अशी नूतन परिस्थिति धारण करावी लागते. वस्तुस्थितीला अनुसरून सावकाश चालू असलेल्या सुधारणेच्या शेवटीं अधिक सुधारणेची आशा सफल व्हावी ह्मणूनच केवळ सारी दृश्य सुधारणेचीं अंगें दिसण्यांत अस्ताव्यस्त करून मोठी उत्क्रांति घडून येत असते. सतत वांकवून ठेवण्यामुळें धनुष्याचा जोर कमी होतो ह्मणून त्याची दोरी जशी वारंवार सैल करून ठेवावी लागते, दिवसाच्या श्रमानंतर जीव जसा रात्रींच्या वेळीं निद्रेच्या कुक्षींत विश्राम पावतो, त्याचप्रमाणें युगायुगाच्या अंतीं राष्ट्राचेही व्यापार अंशत: स्तब्ध होतात, आणि त्यास कांहीं वेळ स्वस्थ रहावें अथवा विश्रांति घ्यावी लागते. जगाच्या इतिहासावरून हा सिद्धांत उत्कृष्ट रीतीनें स्थापन झाला आहे, व सृष्टिनियमांच्या स्वभावालाही तो अगदीं अनुसरून आहे. दिवसाचा थकवा झोपेनें भागतो; आयुष्याचा थकवा मरणानें दूर होतो; दिवसाच्या अनुभवांतील तत्वांश निद्राकालीं अंत:करणाच्या स्वभावांत जाऊन मिसळतो; आयुष्यांतील अनुभवांच्या संस्कारांचा निष्कर्ष मरणोत्तरकालीं खोल जाऊन अंत:करणाच्या स्वभावांत मुरतो आणि तेथें स्थिरावतो. शरीराच्या आणि स्वभावाच्या स्थितींत आणि घटनेंत याप्रमाणें फेरबदल होत असतात. निद्रा, मरण, राष्ट्रीय अवनति अथवा लघुप्रलय, महाप्रलय या संस्था जर जगांत नसत्या तर शिक्षणाच्या आणि अनुभवाच्या संस्कारांचें इष्ट कार्य शरीर, मन आणि परिस्थिति यांवर पूर्णपणें घडलें नसतें,

स्वभावसुधारणा, आणि आत्मोन्नति या केवल असाध्य कल्पनाच होऊन बसल्या असत्या, आणि जगदुद्धाराचा ईश्वरी संकल्प सिद्धीस गेला नसता. एका जन्मांत माणसाची योग्यता किती थोडी वाढवितां येते आणि अनेक उपायांनीं देखील त्याच्या मूल स्वभावांत किती थोडा बदल करितां येतो, हें ज्याच्या लक्षांत आलें असेल आणि प्रत्येक गोष्टींत प्रत्येकाला अथवा प्रत्येक पिढीला नेहमीं नव्यानें आरंभ करावा लागत नसून, मन आणि कर्म-संस्कार यांचा एक अंशही वाया जात नसल्यामुळें परिणामरूप संचित कर्माच्या चढत्या पायावर पुनः कर्माला आरंभ होतो, व ह्मणूनच प्रगति संभवनीय आहे, आणि ऐश्वर्याची सुस्थिति साध्य आहे याविषयीं ज्याची खात्री पटली असेल, त्याला वरील प्रलयरूप अत्यंत उपयुक्त स्थितींच्या अवश्यकतेविषयीं संदेह उरणार नाहीं. या स्थित्यंतरांतून समाज आणि व्यक्ति प्रगतीच्या वाटेनें सावकाश जात असतांना, त्यांच्या उत्कर्षाच्या काळापूर्वी आणि नंतर सामर्थ्याच्या, ज्ञानाच्या आणि गुणाच्या अपकर्षाचा अथवा अभावाचा काल असतो. प्रौढ दशेंत प्रगट होणारे गुण अति सूक्ष्म बीज-रूपानें न कळण्यासारख्या स्थितींत जसें बाल्यावस्थेंत असतात, तसेंच ते कमी होत होत वृद्धावस्थेंत पुनः भावी वृक्षाच्या उद्देशानें अति सूक्ष्म बीजस्थितीप्रत पावतात. आणि या दोन अवस्थांना जोडणाऱ्या मधल्या गूढ अवस्थेंत मोठी किमिया होऊन स्वभावाच्या, प्राणाच्या आणि प्रकृतीच्या स्थितींत मोठी घडामोड होते. अशी घडामोड होण्यापूर्वी सर्व अंगांनीं दुर्बलता येऊं लागते आणि त्यामुळें विपरीत गोष्टी घडूं लागतात. उद्योग अप्रिय होतो, सुखापुढें कर्तव्य तुःच्छ वाटतें, आयदीपणा वाढतो, मूर्ख शाहणे ठरतात, आणि त्यांच्या विचारपूर्वक अविचारामुळें खऱ्या शहाण्यांना विष प्यावयास दिलें जातें, उन्मत्तपणा येतो, कलह माजतात, मनोविकार शिरजोर होऊन धन्याविरुद्ध बंड करितात, शक्तींचें आकर्षण होऊन शिथिलता येते, जूट फुटते, बुद्धिभ्रंश होतो आणि शेवटीं डोळ्या-देखत नाश अथवा लय होतो, व्यक्ति आणि राष्ट्राच्या हितासाठीं भगव-दिच्छेला अनुसरून असा प्रसंग पाळीपाळीनें व्यक्तीवर आणि राष्ट्रावर योग्यकालीं येतो, आणि विश्वधर्माच्या व्यापक तत्वांकडून पाहतां तसें

होणें अगदीं स्वाभाविक, अवश्य, आणि इष्ट आहे. महर्षी व्यासांनीं पूर्वी जें भविष्य कथन करून ठेविलें आहे, त्याचें तात्पर्य हेंच होय आणि त्याप्रमाणें अनुभवही आला. ग्रीस, रोम, मिसर, इत्यादिकांप्रमाणें भरतवर्षालाही हें दिव्य करावें लागलें. जें होणार तें झालें, आणि जें झालें तें होणार असलेंच पाहिजे. ही दु:खाची गोष्ट कदाचित् असेल; परंतु अपरिहार्य असल्यामुळें तिचा दोष आचार्य आणि प्रजा यांपैकीं कोणाकडेही येऊं शकत नाहीं. उलट आमच्या सुदैवानें आह्मावर तेजस्वी आचार्यांचें छत्र असल्यामुळें उत्तम, धैर्यवान् नाविक ज्याप्रमाणें भयंकर तुफानांतूनही आपली नौका सुरक्षित पैल तीरास नेतो, त्याप्रमाणें आचार्यांनींही प्रलयकालीं आमच्या देशाचें, जीविताचें आणि संचिताचें संरक्षण करून आमच्या जीवयात्रेस पुन: आरंभ करून दिला, याबद्दल त्यांचे आपण जितके उपकार मानूं तितके थोडेच होतील.

जीव आहे या स्थितींत जोंपर्यंत आहे, आणि पदार्थावर त्याचें प्रभुत्व चालतें आहे, तितकेंच जोंपर्यंत चालत राहील तोंपर्यंत, केवळ त्यांच्या उन्नतीच्याच उद्देशानें, त्याच्या सांप्रतच्या कमी योग्यतेला अनुसरून, त्याच्या मागचा हा आमच्या दृष्टीनें इष्टानिष्ट दशाक्रम सुटणार नाहीं. कारण, त्याच्या सुधारणेसाठीं तो पाहिजे आहे; असा प्रसंग त्याजवर पुनः कधीं न येईल अशी त्याची योग्यता वाढविण्यासाठीं तो प्रसंग पाहिजे आहे; हें अनिष्ट अरिष्ट चुकविण्यासाठींच हें अरिष्ट इष्ट आहे; परंतु माणसाची व जगाची योग्यता वाढत आहे, बुद्धीचा विकास होत आहे, शक्तींचे नियमन होत आहे, आणि जगाच्या इतिहासांत एक काळ खचित असा येईल कीं, ज्यावेळीं, सुख, सत्ता आणि सत्य यांचा पूर्ण लाभ होईल, माणसाचें ऐश्वर्य वाढेल, आणि जगाचा उद्धार होईल. ही स्थिति अर्थात् क्रमाक्रमानें प्राप्त होईल. पायरी पायरीनें तेथपर्यंत जावें लागेल, व या पायऱ्या चढत असतांना प्रत्येक ठिकाणीं लहान मोठे प्रलयाचे प्रसंग येतील. परंतु एके काळीं माणसाची अध्यात्मिक योग्यता वाढल्यानंतर प्रलयाचेंही प्रभुत्व माणसाकडे येईल, मरण त्याच्या स्वाधीन होईल. राष्ट्रीय अवनतीचें भय उरणार

नाहीं आणि यौगिक सामर्थ्याच्या द्वारें अपकर्षाचें निर्मूलन होऊन, प्रगतीची आणि उत्कर्षाची वाट मोकळी आणि निर्विघ्न होईल, हें विघ्न कां उत्पन्न होतें यांतील वर्म कळेल व तें चुकविण्यासाठीं पाहिजे असलेली तयारी करितां येईल. तोंपर्यंत मरणाला आणि प्रलयाला मनुष्यानें संतोषानें तयार असलें पाहिजे. तथापि राष्ट्रीय प्रलयस्थिति लांबणीवर टाकितां येईल, कदाचित् अजीबातहि टाळितां येईल. निदान तसा नेहमीं दृढतर विश्वास असला पाहिजे, त्यासाठीं आशायुक्त सतत प्रयत्न झाला पाहिजे. आणि प्रभूची कृपा संपादून त्याचें साहाय्य मिळविलें पाहिजे. यासंबंधानें जगाच्या एकंदर अनुभवावरून, ज्ञानप्रसाराच्या अनिवार वेगावरून, चैतन्याच्या स्फुरणावरून, जीवाच्या जागृतीवरून, मनोवृत्तींच्या स्वाधीनतेवरून, आग्रहांच्या साधारण शिथिलतेवरून आणि मनाच्या विकासावरून पूर्वी ज्या तेजस्वी राष्ट्रांनीं मरणाचा एकदां सावधपणानें आणि शहाणपणानें अनुभव घेतला आहे, व ज्यांच्या पुनरुज्जीवनास पुनः जोरानें आरंभ झाला आहे, त्यांना पुनः मरावें लागेल असें होणार नाहीं, इतकेंच नव्हे, तर मागें ज्या उच्च स्थानीं शेवट झाला तेथून त्यांचा पुढें आरंभ झाला असल्यामुळें, आणि जी पूर्वार्जित उत्तम सामुग्री अखेरीस जवळ होती, ती आरंभाला हातीं घेऊन, तो पुढें सरसावत असल्यामुळें, आतांच्या प्रदक्षिणेच्या शेवटीं हीं राष्ट्रें योग्यतेच्या अशा उच्च पदवीला जाऊन पोहोंचतील कीं, जेथें त्यांना काळाचेंही भय उरणार नाहीं व आपल्या विशेष थोरपणामुळें आणि अमरत्वामुळें तीं इतर अल्पवयस्क राष्ट्रांचें दुर्दशेपासून संरक्षण करण्यास समर्थ होतील.

आतां सोन्याला ज्याप्रमाणें आत्मशुद्धीसाठीं अग्निप्रवेश करावा लागतो, त्याप्रमाणें आत्मोन्नतीसाठीं आर्यावर्ताला आपल्या सर्वस्वासह इतर कांहीं भाग्यशाली राष्ट्रांप्रमाणें विश्वधर्माला अनुसरून प्रलय दर्शोतून जावें लागलें हें खरें, व त्या कालीं त्याचें वैभव आणि साम्राज्य मावळलें हें ही खरें. त्याचें तें पूर्व पुण्यामुळें लाभलेलें ऐश्वर्य नष्ट झालें काय? त्याचा नाश झाला काय? कीं आर्यांच्या जातीचा निर्वंश झाला? किंवा त्यांना दीनवदन होऊन देशत्याग करावा लागला? यांपैकीं कांहींही झालें नाहीं,

व कदापि होणार नाहीं. पूर्व संस्कार कधीं वाया जात नाहींत, व जगांत कांहींही नाश पावत नाहीं. सूर्य या भागाला मावळला ह्मणून जगांतून नाहींसा झाला नाहीं. पोषक उष्णतेचें शोषण दुसरे दिवशीं चांगल्या रीतीनें करितां यावें, आणि थंडी व अंधकार यांच्या आश्रयानें आधीं शोषिलेल्या उष्णतेपासून उत्पन्न होणाऱ्या उपयुक्त क्रिया बरोबर घडाव्या–झाडांची वाढ, फलपुष्पांचा उद्गम, इत्यादि क्रिया माणसाच्या दृष्टीच्या आड रात्रींच्या वेळींच घडतात, हें प्रसिद्ध आहे—या उद्देशानें व तसेंच दुसऱ्या भागालाही उष्णतेनें उत्तेजित करण्याकरितां पृथ्वीच्या पृष्ठ भागावर रात्र आणि दिवस मागें मागें येतात. त्या दोन्ही वेळीं पृथ्वी सर्वस्वी सूर्याच्या अनुशासनाखालीं असते. त्याचप्रमाणें ज्ञान, मान आणि कर्म, पदार्थ, शक्ति आणि सुधारणा यांचा एकदां उद्भव झाला असतांना त्या आपल्या पूर्वीच्या अनुरूप बनलेल्या जागेंतून नाहींशा होत नाहींत, इतकेंच नव्हें, तर त्या ज्या स्थितीस पोहोंचल्या असतील, तेथून सर्व संस्कारासह बालाग्रही मागें हटत नाहींत. जेवढें घडतें तेवढें कायमचें पदरांत पडतें. आह्मी आर्य सर्वांत वडील आहों, ज्ञान पुरुषार्थ आणि पराक्रम यांत सर्वांच्या पुढें गेलेलें आहों; तेव्हां आह्मीं नेहमीं वडीलच राहणार, आणि सर्वांच्या सदोदित पुढेंच असणार. भाग पडल्यामुळें घटकाभर झोंपीं गेलो होतों ह्मणून काय झालें? निद्रा आली ह्मजे प्राण गेला असें होत नाहीं; तसेंच निद्रेंतून पुनः जागृतींत आल्यानंतर कांहीं कालपर्यंत अंगीं असलेले गुण, तेज, अनुभव आणि सामर्थ्य हीं जशीच्यातशीं पुनः प्रगट होत नाहींत असेंही नाहीं. उलट विश्रांतीनंतर गुणांचें तेज अधिक खुलतें आणि सामर्थ्याचाही प्रभाव द्विगुणित होतो. तीन चार शतकांपूर्वी कांहीं जुलमी यवनांकडून जेव्हां दुःसह त्रास झाला आणि प्रजेच्या सामर्थ्याच्या, धैर्याच्या युक्तिच्या आणि देशभक्तीच्या परीक्षेची जेव्हां वेळ आली, तेव्हां प्रभूच्या कृपेनें महाराष्ट्रीयांनीं अकस्मात् असलें विलक्षण क्षात्र तेज प्रगट केलें आणि प्रजेचें रक्षण करून, आपलें प्रभुत्व अशा अद्वितीय रीतीनें गाजविलें कीं, ज्यांकडे पाहून साऱ्या जगानें सर्वकाल विस्मयच करीत रहावें! तसेंच चालू शतकाच्या सरासरी

आरंभापासून उदार इंग्रजी अमलाखालीं आर्य प्रजाजन सुखानें शांततेचा उपभोग घेऊं लागल्यानंतर, विद्या, विचार, कला, आणि कर्म यांचा आह्मीं केवढा उत्कर्ष केला, आणि अवघ्या ९०।६० वर्षांच्या अवकाशांत बोस, बानर्जी, आणि चतर्जी, तेलंग, रानडे आणि टिळक, मंडलीक, कुंटे आणि चिपळूणकर, दयानंद, विवेकानंद आणि राममोहन, दत्त, फिरोजशहा मेथा, आ० दादाभाई, रणजितसिंह, व परांजपे इत्यादि अनेक बुद्धिमान् पुरुष भरतखंडांत निर्माण होऊन, त्यांनीं धर्म, शास्त्र, आणि सुधारणा यासंबंधानें इतकी कामगिरी केली कीं, तिजकडे पाहून युरोपीय सुज्ञांनीं देखील आमच्या नैसर्गिक बुद्धिमत्तेबद्दल आणि कल्पकतेबद्दल खरोखर संतोषानें मानाच डोलविल्या! येवढ्या वेगानें कालाला आणि योग्यतेला वश करून आह्मांला पुढें सरसावतां येते, हें पाहून राष्ट्रीय प्रगतींत आह्मीं इतरांस लवकरच गांठू इतकेंच नव्हे, तर त्यांच्या पुढें जाऊन आपल्या स्वाभाविक बुद्धिबलानें त्यांचें नायकत्वहीं योग्य कालीं स्वीकारूं अशी आह्मांस भरपूर आशा आहे. ही आशा केवळ जीवाला बरें वाटावें ह्मणून प्रयासानें उत्पन्न केलेली नसून पार्थिव आणि अध्यात्मिक शास्त्रांच्या मूलतत्वांवरून ती चांगली साधार ठरते, व जगाच्या ऐतिहासिक अनुभवांवरूनही तीस पुष्कळ पुष्टीकरण मिळतें. जर या जगांत नाश कशाचाच होत नसून नुसतें रूपांतर मात्र घडतें, नुसतें अवस्थांतर मात्र घडतें, जर मरण ह्मणजे अंतःकरण चतुष्टयासह प्राणाचा नाश नसून, प्राणपोषणाची अत्यावश्यक गूढ स्थिति आहे, जर पदार्थावर आणि मनावर घडलेले संस्कार अविनाशी आणि आनुवंशिक असतात, आणि जर या जगाला सोडून येथील पदार्थाला आणि मनाला निघून जाण्याला दुसरें ठिकाण नाहीं, तर आमच्या पूर्वजांनीं अनुष्ठिलेल्या कर्माचे, ज्ञानाचे आणि उपासनेचे दृढ संस्कार आमच्या देहांत आणि मनांत खचित वसत असले पाहिजेत. बीजाच्या छोट्याशा दलांत जसा भावी मोठा थोरला वृक्ष सांठविलेला असतो, लहान अर्भकाच्या देहांत जसें सामर्थ्य आणि ज्ञान भरलेलें असतें, तसेंच आर्यपुत्रांच्या देह, मन, आणि परिस्थिति यांत प्रचंड जुन्या सुधारणेच्या शेवटचें आणि त्याहूनही प्रचंड भावी

सुधारणेच्या आरंभीचें बीज रुजत घातलेलें आहे. अल्पवयस्क मुलांत भावी तत्ववेत्ता दृग्गोचर होत नाहीं, त्याप्रमाणें आमच्या भावी उत्कर्षाचीं चिन्हें आज पूर्णपणें आह्मांत दिसत नसतील; परंतु तीं तेथें आहेत व योग्यकालीं तीं आपोआप प्रगट होतील. याला प्रमाण आमचे पूर्वज भाग्यशाली, विक्रमशाली आणि ज्ञानसंपन्न होते, हें एक व दुसरें त्या महात्म्यांचे आह्मीं खरे खरे वारस आहों. यापरतें आह्मांला निदान दुसरें प्रमाण नको आहे, व कोणाही जाणत्याला तें नको असेल. आमचे पूज्य पूर्वज मरून नाशाला पावले नाहींत, आणि आमची सुधारणा अथवा वैभवही नष्ट झालें नाहीं. आपल्या पूर्वजांचा पराक्रम आमच्या स्नायूंत भरलेला आहे, त्यांचें वीर्य आमच्या रक्ताबरोबर वहात आहे, व त्यांचें ज्ञान आमच्या मस्तिष्कांतील परमाणूंत मिसळलें आहे. ते आह्माला अनाथ करून चालते झाले नाहींत; आमच्या तनूंत आमच्या उद्धारासाठीं ते वास करीत आहेत. आह्मांविषयींचें त्यांचें प्रेम आह्मांला टाकून त्यांना खचित जाऊं देणार नाहीं. ते आमच्या अगदीं निकट राहून, केवळ आमच्या प्राणांत शिरून, आमचें रक्षण करीत आहेत. आमची जसजशी वाढ होत जाईल, शरीर आणि मन मोठ्या कार्याजोगें जसें मोठें होत जाईल, आणि आमचा प्रयत्न जसा नेटानें चालेल, तसें तें आह्मांत प्रगट होतील, आणि आमच्या हातून महत्कार्य करवून जगांत आह्मांस खचित धन्य करितील. अहाहा, आर्यांचें केवढें हें धन्य भाग्य! केवढी त्यांची पुण्याई, केवढी पूर्वजांची कृपा. परमेश्वरांची त्यांजवर मोठीच दया असली पाहिजे; आणि त्यांनीं जर प्रभूच्या इच्छेला मान देऊन, त्याची आज्ञा सदोदित संतोषानें पाळिली तर त्याचें प्रेम आर्यवंशावर कां असणार नाहीं, व त्यांच्या उन्नतीस तो कसा साहाय्य करणार नाहीं? ईश्वरी कृपेवांचून ऐश्वर्य प्राप्त होणार नाहीं, आणि तें आह्मांला यथेच्छ लाभलें होतें, येवढ्यावरून व आवश्यक प्रलयस्थितीनंतर पुनः उत्कर्ष होण्याला पाहिजे असलेल्या गोष्टींची आह्मास अनुकूलता आहे, यावरून आर्यजनांवर ईश्वराची कृपा आहे याविषयीं बिलकुल संदेह नाहीं. येवढा उत्कृष्ट स्वतःचा इतिहास

पाठीशीं असल्यावर आणि भावी सुस्थितीच्या लाभाविषयीं आशा बाळगण्याला इतकी भरपूर जागा असल्यावर आह्मांला आणखी उत्तेजन तें काय पाहिजे? प्रभूचें नांव घेऊन, धीर धरून, केवळ स्वतःच्याच बळावर अवलंबून राहून, आह्मीं स्वतः निग्रहानें आणि दक्षतेनें सात्विक प्रयत्न केल्यास आह्मांस इष्ट लाभ होईल, आणि आमचे सर्व मनोरथ खचित सफल होतील. यशाची इच्छा करणारानें आशा मात्र शिथिल होऊं देऊं नये, आणि सुस्थितीची सुंदर कल्पना समोर ठेऊन, ती सिद्ध करण्यासाठीं पराकाष्ठेचा विचार आणि उद्यम केला पाहिजे. बुद्धिदौर्बल्यामुळें आणि वृत्तिक्षीणतेमुळें एखादेवेळीं जें कार्य अशक्य वाटतें तें स्वभावतः तसें असतें, अथवा सर्वदा तसें असतें असें नाहीं. सामर्थ्य वाढत चाललें ह्मणजे एकदां अविचारानें जें अशक्य ह्मणून ठरविलें होतें तेंच कार्य पुढें अत्यंत सुखकर होतें. तेव्हां अवांतर गोष्टी कितीही प्रतिकूल असल्या तथापि विचार सदोदित मोठे असावेत, आशा दृढ असावी आणि देवादिकांना जी पदवी प्राप्त व्हावयाची, ती स्वतः देवपद प्राप्त करून घेऊन मिळविण्यावांचून राहणार नाहीं, अशी तीव्र उत्कंठा प्रत्येक आत्महित इच्छिणाऱ्या खऱ्या माणसाच्या हृदयांत सतत धुमसत असावी; ह्मणजे इच्छेच्या अनुरोधानें प्रयत्न घडेल आणि प्रयत्नाच्या समागमानें यशःप्राप्ति होईल.

प्रस्तुत पुस्तकांतील निबंधांच्या धोरणावरून असें स्पष्ट दिसून येईल कीं, ते सामान्यत्वेंकरून सर्वांच्या आणि विशेषेंकरून सामान्य जनांच्या हितासाठीं आचार्यांनीं तयार केले आहेत. ते आपल्या लोकांच्या मनावर दृढ ठसावेत आणि त्यांना अनुसरून त्यांचें वर्तन घडावें, याविषयीं योग्य प्रयत्न त्यांजकडून होईल. त्या प्रयत्नास आह्मां सर्वांचें साहाय्य पाहिजे व तें संतोषानें दिलेंच पाहिजे अशी प्रेरणाही ते आमच्या मनांत उत्पन्न करितील, कीं जिला वश होऊन त्यांच्या इच्छेबाहेर जाण्याची आह्मांस इच्छाच होणार नाहीं. योग्यतेनें जे थोर असतील, ते परमेश्वराचे साक्षात् शिष्य असल्यामुळें त्यांचे वर्तननियम त्यांस प्रभूपासूनच प्राप्त होतात व त्यांजकडून आमच्या योग्यतेप्रमाणें

आमचें नियमन होतें. थोर पुरुष परमेश्वराच्या स्वाधीन आहेत; तथापि आह्मांस ते केवळ स्वतंत्र दिसतात; कारण मोठ्या अधिकारामुळें आमचे धाकटे नियम त्यांस बांधूं शकत नाहींत. थोरांच्या थोर आणि शुद्ध अंतःकरणांत साहजिक जे विचार उत्पन्न होतात, ते आह्मांला हितकर नियमासारखे असतात. समाजाच्या दृष्टीनें सत्पुरुष स्वतंत्र होत व ह्मणूनच त्यांस आमच्या जगण्याचे आणि वागण्याचे निर्बंध घालून देण्याचा अधिकार येतो. आह्मीं त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागावें यांतच आमच्या उद्धाराचा मार्ग आहे व त्यांनीं स्वतःच्या अंतःकरणप्रवृत्तीला मान देऊन वागावें यांतच त्यांचें कर्तव्य आणि आमचें हित आहे. तेव्हां हे सामान्य नियम समाजाकरितां असले पाहिजेत, हें उघड आहे व त्यांचा आह्मीं स्वीकार करून कृतकार्य व्हावें हेंच आमचें सुलभ कर्तव्य आहे. दुरून ऐकून या निर्बंधांचें मीं टिपण केलें असल्यामुळें, ह्मणजे अंगच्या अधिक योग्यतेनें ते स्वबुद्धींतून निर्माण झालेले नसल्यामुळें त्यांत कांहीं दोष आढळतील व थोरांच्या परिषदेंत घडलेली हकीगत—तिचें कितीही अल्पमतीनें श्रवण झालेलें असो—प्रसिद्ध करीत असल्यामुळें तींत कांहीं गुणही खचित सांपडतील. भल्या माणसांनीं त्यांत जेवढा गुण मिळेल तेवढा स्वतःच्या हितासाठीं स्वतः घ्यावा आणि दोष दिसेल तेवढा माझ्या हिताकरितां माझ्या पदरांत टाकावा. माझे दोष मला जितके अधिक समजतील, तितकी मला आपली अधिक सुधारणा करून घेतां येणार असल्यामुळें, ते दाखविणारांचे मी खरोखर फार उपकार मानीन. परंतु गुणाकडे लक्ष न देतां केवळ दोष काढण्यांत आणि दाखविण्यांतच कोणास मौज वाटल्यास, त्याच्या त्या कृत्यापासून माझें हित होणार असल्यामुळें, मी जरी त्याचा फार आभारी होईन तथापि डाळींतून डोळ निवडून घेणाराप्रमाणें, केवळ दोषाच्या परिचयामुळें त्याचें चित्त भ्रष्ट झालेलें पाहून आणि गुणाच्या लाभास त्यास मुकलेला पाहून मला, खरोखर फार दुःख वाटेल. प्रत्येकानें स्वार्थबुद्धीनें गुण दिसेल तेवढा घेत असावा आणि परमार्थबुद्धीनें व बंधुप्रीतीनें दोष दाखवीत असावा इतकेंच सुचविणें आहे.

शेवटीं, प्रभूची आज्ञा पाळण्याकरितां, पूज्य पूर्वजांची इच्छा सफल करण्याकरितां, आणि स्वतःचें श्रेष्ठ कर्तव्य तडीस लाविण्याकरितां पाहिजे असलेलें ज्ञान, आणि बल माझ्या देशबंधूंच्या अंगीं उत्पन्न करण्याविषयीं भक्तीनें, प्रेमानें, आणि स्वाभिमानानें त्यांचीं अंतःकरणें आर्द्र करण्याविषयीं आणि त्यांची सर्वप्रकारें योग्यता वाढवून कृपादृष्टीनें त्यांस पावन करण्याविषयीं प्रभूची अनन्य भावानें प्रार्थना करून, त्यांस प्रसाद मागतों, आणि हें लहानसें पुस्तक प्रिय वाचकांच्या ओटींत घालितों. राष्ट्राच्या उन्नतीचें कार्य असामान्य आणि कष्टसाध्य आहे. तें सिद्ध होण्यास विलक्षण कर्तव्यबुद्धि लोकांत उत्पन्न झाली पाहिजे, उपयुक्त गुणांचें ज्ञानाचें व सामर्थ्याचें स्फुरण झालें पाहिजे, आणि मोठा स्वार्थत्याग व मोठी अर्थबुद्धि लोकांत उत्पन्न झाली पाहिजे. देवाच्या दयेवांचून येवढी तयारी होणें दुर्घट आहे, ह्मणून सर्वांनीं त्यांस शरण जाऊन आपापल्या कर्तव्याला आरंभ करावा, हेंच शुभ आणि ह्मणून फलप्रद आहे.

एलिचपूर, वऱ्हाड.
ज्येष्ठ वद्य ११ शके १८२१.

दत्तात्रेय कृष्ण दामले.

# आचार्यपरिषद्.



यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥

भगवद्गीता.

अबाधकं साधकंच जगदीश्वरनिर्मितम् ।
अपनेतुमशक्यं चेत्यास्तां तद्विष्यते कुतः ॥

पंचदशी.

काळाभोर विंध्याचल मागल्या अंगास आभाळाला लागून पूर्व-पश्चिम पसरला आहे. समोर जवळच नर्मदा आपल्या विशाल पात्रांतून संथपणें वहात आहे. दोहोंच्यामध्यें विस्तीर्ण पटांगण पडलें आहे. आकाश स्वच्छ व नील असून सतेज तारकापुंजांनीं भरलें आहे. नक्षत्रांसह आकाशाचें प्रतिबिंब पाण्यांत पडलें आहे. दिवस चैत्र शुद्ध प्रतिपदेचा होता. करकरीत मध्यरात्रीचा समय येऊन पोहोंचला होता. जिकडे तिकडे अगदीं सामसूम होतें. वायुदेखील स्तब्ध झाला होता. काळोखानें सर्व ग्रासून टाकिलें होतें. विंध्याचलाचा भव्यपणा, नर्मदेचें गांभीर्य, नक्षत्रांचें पावित्र्य व रात्रीचा एकांत या गुणांनीं त्यावेळेला व स्थळाला अवर्णनीय शोभा आणिली होती. स्वतः पाहूनच ती जाणावी; एरवीं शब्दांनीं ती कळणें अथवा कळविणें अशक्य आहे. त्यावेळेच्या शांततेची चंचल मनाच्या व्यावहारिकाला कल्पनादेखील करितां यावयाची नाहीं. जड वातावरणांत राहणाऱ्या प्राण्याला अत्यंत विरल अथवा निर्वात प्रदेशांत नेलें असतां त्याच्या अंगांतील प्राणवायु शरीराचे बांध फोडून जसा अस्ताव्यस्त पसरत जातो, तद्वत् घन मनाला एवढ्या विरळ शांततेच्या स्थितींत नेऊन सोडिलें असतांना मोठी दुर्दशा होऊन मनाचा मनपणाही हरपून जाईल. एवढी ती स्तब्धता कीं तिचा अनुभव घेण्यापुरतें स्तब्ध होणें साधारण मनाला अशक्य होतें. एखाद्या प्रचंड तत्वाचा अथवा कार्याचा संभव आणि प्रसव होण्याचीच ती वेळ आहे

कीं काय असें वाटत होतें आणि पुढें घडलेल्या प्रकारावरून वरील अनुमान खरें ठरलें.

अशा समयीं एकाएकीं वरील पटांगण मंगळाच्या प्रकाशासारख्या किंचित् रक्तवर्ण प्रकाशानें खालपासून वरपर्यंत एकाएकीं ओतप्रोत भरून गेलें. प्रकाशाचा पुरवठा कोठून व कसा होत होता हें अगदींच कळत नव्हतें. खालची जमीन स्वच्छ केलेली दिसत होती. तीवर अष्टकोणाकृति मंडळांत ८८ हजार कुशासनें आंथरलीं होतीं. प्रत्येक आसन सहा अंगुळें उंच अशा लहानशा ओट्यावर असून दोन आसनांमध्यें दोन वितींचें अंतर राखिलें होतें. आसनाजवळ तमसा नदीच्या पाण्यानें भरलेला कलश ठेविला होता. मंडळाच्या आठ बाजूंपैकीं एकेबाजूस दीड पुरुष उंचीचें भव्य पीठ तयार केलेलें होतें; त्याचा आकार अर्धचंद्राप्रमाणें असून क्षेत्रफळ एक हजार चौरस हात होतें. पीठाचा वर्तुळ भाग सन्मुख होता व मागील बाजूनें वर चढून जाण्याकरितां पीठाच्या लांबीशीं समांतर अशा ६ पायऱ्या केलेल्या होत्या. मंडलाच्या बरोबर मध्यभागीं वेदी असून तींत अगुरु, चंदन, गुग्गुळ इत्यादि धूप जळत होते. तो सुवास पटांगणभर पसरला होता. मंडळाच्या आठही बाजूंस अष्ट दिक्पाल दोहों हातांत दोन मोठाले नाग घेऊन उभे होते.

इतक्यांत वेदीच्या समीप तीन मूर्ति दिसूं लागल्या. ते, वेदव्यास, महर्षि पतंजलि, व याज्ञवल्क्य, होते. पतंजलींनीं कांहीं मंत्र ह्मणावयास आरंभ केला व हात वर उचलून, येण्याची दोन वेळ खूण केली. तोंच शंकराचार्य आणि रामदास स्वामी येऊन दाखल झाले. त्यांचें थोडावेळ संभाषण झाल्यानंतर याज्ञवल्क्यांनीं डोळे मिटले व हात वर केला. त्यासरशीं सर्व ब्रह्मवेत्ते ऋषिमंडळ दाखल झालें व आपल्या आसनावर बसले. नंतर वेदीसमीपस्थ पांचही आचार्य पीठाभिमुख उभे राहिले. इतर सर्व मंडळीही उभी राहिली. सर्वांनीं माना किंचित् खालीं लवविल्या, डोळे मिटले, हात उभारले व चंडि आणि विनायक यांची प्रार्थना करून आवाहन केलें. मंगलमूर्ति पीठारूढ

होतात, तोंच आकाशांत एकाएकीं प्रचंड गडगडाट झाला; सोन्याच्या रसाप्रमाणें पिंवळा तेजाचा लोळ वरून निघाला तो सर्वांचे डोळे दिपवीत सभास्थानापर्यंत एकदम येऊन पोहोंचला. व पुनः तशाच वेगानें आकाशांत परत फिरून अदृश्य झाला. आदिशक्ति चंडि पीठावरील प्रमुख आसनावर अधिष्ठित झाल्या. ॐ शांतिः शांतिः शांतिः जिकडे तिकडे शांत झालें. सर्वांचे डोळे पीठाकडे लागले. इतक्यांत आदि-मायेनें उठून भाषणास आरंभ केला. तो सिंहनाद, तें गांभीर्य, तो आवेश, तें वात्सल्य, अवर्णनीय होतें–निरुपम होतें. त्या ह्मणाल्या—

" प्रिय पुत्रांनो! प्रभूच्या इच्छेला अनुसरून व आपल्या कर्तव्याला प्रामाणिकपणानें स्मरून तुह्मीं भारतीयांनीं साऱ्या जगांत ज्याला जोड मिळावयाची नाहीं अशा ज्ञानाची, अशा नीतिमत्तेची व अशा पुरुषार्थाची प्राप्ति करून घेतली. अत्यंत बंधुप्रीतीनें व लोककल्याणेच्छेनें त्या सद्गुणांचा व त्या ऐश्वर्याचा सर्वांस अधिकारानुरूप लाभ करून देण्या-विषयीं यत्किंचितही कसर केली नाहीं. देवादिकांनाच जें समाधान, जी तृप्ति व जो आनंद अनुभवावयास सांपडावयाचा तें समाधान, ती तृप्ति व तो आनंद तुह्मी योग्यतेनें हस्तगत करून घेतला व अक्षय्य आप-लासा करून ठेविला. भरतभूमीचा उद्धार केला; सत्कर्मांनीं तिला स्वर्गलोकाहूनही अधिक श्रेष्ठत्व आणिलें. त्यामुळें देवादिकांनाही येथें येऊन राहण्याची इच्छा होऊं लागली. ज्ञानगंगेंत अंतःकरणाचें प्रक्षा-लन करून त्यांवरील विपरीत संस्काराचा कलंक घालविला. आणि स्वाभाविक दिव्य स्थिति प्राप्त करून घेतली. सापेक्षता व द्वैत, जाड्य व संशय यांचा निरास करून अपरोक्षानुभूतीनें केवलतत्वाचा लाभ करून घेतला व सर्वज्ञ बनला. मोठें तप केलें, मोठा पराक्रम केला, अपार दैवी आणि लौकिकी संपत्ति वश केली, हें पाहून आह्मांला फार कौतुक वाटलें. तुह्मी परक्यांचा छल केला नाहीं. परक्यांच्या स्वातं-त्र्याच्या आड तुह्मीं कधीं आला नाहीं, समभावानें सर्वांचें अभीष्टच तुह्मीं चिंतिलें. तुमच्या गुणाला व लौकिकाला पाहून देवांना परम समाधान वाटलें. परकीयांना तुह्मीं गुलाम करून ठेविलें नाहीं, त्यांचा मुलुख काबीज करून त्यांच्या स्वातंत्र्याचा आणि सर्वस्वाचा तुह्मीं

अपहार केला नाहीं, दुसऱ्याला भिकारी करून स्वत:ला श्रीमान् बनविलें नाहीं, तुह्मी दुसऱ्याला धुळीस मिळवून आपल्या वंशाची अभिवृद्धि करून घेतली नाहीं, परकीयांच्या रक्तानें तुमचे हात विटाळले नाहींत, धर्माच्या वेडानें, धनाच्या लोभानें अथवा राज्याच्या तृष्णेनें तुह्मीं कधीं गाफल झाला नाहीं व त्या वेडाच्या धुंदींत दुसऱ्या राज्याचा, ऐश्वर्याचा, आणि जीवाचा संहार करीत सुटला नाहीं, मत्त गजाप्रमाणें पृथ्वीच्या पाठीवर धिंगाणा घालून रक्ताच्या नद्या उपन्न केल्या नाहींत, व त्यांत आपल्या पितरांना स्नानें घालून नरकपुरीच्या वाटेस लाविलें नाहीं. दुसऱ्या दुबळ्यांनीं जें काम केलें व ज्याला पराक्रम असें नांव दिलें, तसलें कांहीं तुह्मा समर्थांना करितां आलें नसतें असें नाहीं. परंतु बाळांनो! तुमचें ब्रीदच निराळें. अंगच्या पशुवृत्तीला अनुसरून तिची तृप्ति करण्याकरितां जिकडे तिकडे उध्वस्तता, ओसाडी, आग, आवर्षण, दैन्य, काळोख आणि असमाधान पेरीत तुह्मी निघाला नाहीं. अंगांतील पशूचा बळी देऊन, महायज्ञ ज्यांनीं केला आणि तेणेंकरून देवांना प्रसन्न करून मनुष्य जातीचें महत्व ज्यांनीं वाढविलें, असे जगतांत तुह्मीच एकटे निर्माण झाला. त्यामुळें सारे देव तुह्मांस सर्वदा अनुकूल आणि वश राहिले. त्यांनीं तुमचें सदोदित साहाय्यच केलें. तुमच्या यशाचा, ज्ञानाचा, ऐश्वर्याचा, योगाचा, शांतीचा आणि आत्म्याचा उत्कर्ष झाला. अत्यंत समाधानानें व बंधुप्रेमानें प्रगतीच्या तत्वांना अनुसरून सर्व ऐहिक आणि पारलौकिक ऐश्वर्य तुह्मी संपादन केलें. जगताला उत्कृष्ट वतनीचें उत्कृष्ट उदाहरण घालून दिलें. धर्म, नीति आणि व्यवहार इत्यादि महत्वाच्या प्रकरणीं जगानें बहुत कालपर्यंत तुमचें शिष्यत्व करावें एवढा अधिकार तुह्मी संपादन केला. सर्व मनोरथ परिपूर्ण झाले, बुद्धीचे आणि मनोवृत्तीचे पांग फेडिले, अशक्य आणि असाध्य कांहीं उरलें नाहीं, सचेतन अचेतन तत्वांचा अंत पाहिला, कार्यरूप अंत:करणाचें आदिकारणाशीं यथाशक्ति तादात्म्य घडविलें, आणि कृतार्थ होऊन अनिर्वचनीय आनंदांत तल्लीन झाला. परंतु त्या दिव्य स्थितींत जगताचें धोरण सुटलें, बाहेरचें ध्यान हरपलें, आणि आत्म्याच्या दिव्यतेच्या उत्कर्षाबरोबर शरीरापासून आणि परिस्थितीपासून दुरावत चालला. देवा-

सारखे होऊन देवासहवर्तमान देवलोकांत राहण्याची योग्यता आली, त्यासरशीं येथें पाप आणि मरण यांनीं ग्रासलेल्या, तमोमय, अज्ञान आणि निद्रा यांनीं परिवेष्टिलेल्या, जड मृत्युलोकांत वास्तव्य करण्याची योग्यता कमी होण्यास आरंभ झाला. राष्ट्रीय दृष्टीनें तुमच्या सांप्रतच्या अवनतीचें बीज तेथेंच रोविलें गेलें; आणि त्याचीच कडू फळें आज आपल्या प्रजेसह तुह्मी चाखीत आहां. भारतीय प्रजाजनहो! कायही आज तुमची दुर्दशा झाली आहे! एकेकाळीं ज्ञानानें आणि पराक्रमानें साऱ्या दुनियेला दिपवून सोडणारे तुमचे पूर्वज कोणीकडे आणि त्यांचें हीन–वीर्य आणि क्षीण–बुद्धि तुह्मी वंशज कोणीकडे? ती महत्प्रयासानें वडिलांनीं मिळवून दिलेलीं धिप्पाड शरीरें कोठें गमाविलीं? ज्ञेयाचा अंत पाहून ईश्वरत्वाला काबीज करूं पाहणारी तुमची तीव्र बुद्धि कोणीकडे गेली? कुबेरालाही लोभ उत्पन्न व्हावा अशी ती तुमची संपत्ति कशी घालविली? जींत राहून सुखच वाटावें, आणि जिला पाहूनही सुख व्हावें, अशी ती तुमची समाजव्यवस्था आणि राज्यपद्धति तुह्माला पारखी कां बरें झाली? तुमच्या वाऱ्यांसदेखील उभें राहूं नये, असें सत्पुरुषास वाटविण्यापुरती पापाची सामुग्री कोणा सैतानास प्रसन्न करून मिळविली? तुमच्या सुस्वभावाला मोहित होऊन रानच्या भिऱ्या आणि क्रूर श्वापदांनींदेखील मित्रभावानें तुह्माजवळ येत असावें, त्या तुमचा साऱ्या ठिकाणीं आज सारखा तिरस्कार कसा होऊं लागला? स्वत्व देऊन असा कोणता जिन्नस खरेदी केला? केवढा तरी तुमच्यांत पालट पडला आहे. अगदीं ओळखूंदेखील येईनासे झाला. पूर्वीच्या प्रतापशाली आर्यांचे तुह्मी पुत्र आहां असें दिसत नाहीं. इतकेंच नव्हे तर तुह्मीं माणसें आहां याबद्दलदेखील संशय पडूं लागला! आचार्यहो! भारतीयांच्या ह्या स्थितीबद्दल तुह्मी सर्वस्वी जबाबदार आहां. त्यांचा सर्वप्रकारें सांभाळ करून त्यांना उत्तम पदवीस पोहोंचविणें आणि तेथें त्यांस सतत कायम राखण्याचें तुमचें काम होतें, व भारतीयांच्या सांप्रतच्या स्थितीवरून पाहतां हें काम तुह्मीं बजाविलें नाहीं असें स्पष्ट सांगावें लागतें. ब्रह्मानंदीं तुमची टाळी लागल्यानें इतर अनधिकाऱ्यांचें संरक्षण आणि तारण आपोआप होईल असा भ्रम तुह्मांस

कसा झाला ! साऱ्या जगाचा भ्रम दूर करण्याची तुमची योग्यता, त्या तुह्मांसच भ्रमानें ग्रासावें हें खचित आश्चर्य होय. हें तुह्मांसारख्यांच्या लक्षांत येऊं नये काय? तस्मात् भवितव्यता बलवत्तर खरी! तुह्मीं केवळ स्वार्थ पाहिला; स्वतःचें साधन सांभाळिलें; राजयोगसाध्य निर्विकल्प समाधींत स्वतःचा लय करून बापड्या अजाण प्रजेस अनाथ करून सोडिलें! एक तर तुह्मीं इतके पुढें वेगानें जावयाचें नव्हतें, किंवा स्वतः बरोबर सर्वांना घेऊन पुढें निघावयाचें होतें, किंवा सर्वांस तुमच्या समागमें तुमच्या चालीनें येववत नाहीं ह्मणून तुह्मी त्यांच्यासाठीं थोडें मागें रहावयास पाहिजे होतें. ईश्वराला साऱ्यांची काळजी आहे, तो सर्वांचें कल्याणच करील हें खरें. तथापि प्रभूच्या हातीं तुह्मीं साधनें आहांत. मनुष्यजातीचा जो उद्धार त्यास करावयाचा आहे, तो तुमच्या द्वारानें, हें तुह्मी विसरावयास नको होतें. आणि जगदुद्धाराचा परमेश्वरी संकेत जर तुह्मांस समजला होता, तर त्याच संकेताला अनुसरून या महत्कार्यांत तुह्मांकडे स्वाभाविक रीतीनें जें कार्य आलें होतें, त्यास सादर असावयास पाहिजे होतें. तेथें तुह्मी चुकलां, तिकडे तुमचें दुर्लक्ष झालें. द्वैतमय जगाकडे पाठ करून, अद्वैतसिद्धि साधून, आनंदमय कोशांत दंग होऊन राहिला. नावेंतील माणसें तरत पैलतीराकडे चालूं लागली ह्मणजे कांठावरचीं माणसेंही पाठोपाठ येऊं शकतात असें नाहीं, त्यांना तुह्मी नेलें पाहिजे. तुह्मी समंजस आहां; तुह्मी समर्थ आहां; आणि ह्मणूनच तुह्मांवर ही जड जोखीम आली आहे. इतरांसारखेंच तुह्मी जर असतां तर मात्र तुह्मांकडे कांहीं बोल नव्हता. परंतु ईश्वरी ज्ञानाचा आणि सत्तेच्या वडीलपणामुळें तुह्मांला जो मोठा वांटा दिला आहे, तो तुह्मांकडे कांहीं मोठें आणि निराळें काम सोंपवावयाचें आहे ह्मणूनच असला पाहिजेना? अधिक गुण दिले आहेत एवढ्यावरूनच अधिक कामगिरी करण्याविषयीं आज्ञा आहे हें स्पष्ट आहे. एरवीं वांया घालविण्याकरितां अशी गुणाची उधळपट्टी व्हावयाची नाहीं. साऱ्या स्थलांचें अज्ञान जोंवर दूर झालें नाहीं, तोंवर तुमच्या दिव्य ज्ञानाचा पूर्ण उपयोग झाला नाहीं. भास्करानें स्वतः सभोंवतालचें वातावरण सप्रकाश केलें ह्मणजे त्याच्या

प्रभावाप्रमाणें त्याचें काम झालें असें नाहीं; त्यानें इतर मंद ग्रहोपग्रहांचीही वातावरणें प्रकाशानें भरिलीं पाहिजेत. तरच त्याच्या तेजस्वितेचें सार्थक. तुह्मीही आपल्या विशेष ज्ञानाचा तसाच उपयोग करावयास पाहिजे होता. पाहणाराच्या डोळ्यांत तेज भरलेलें असलें ह्मणजे दिसणारे सारे पदार्थ डोळस होतात असें नाहीं. दुनियेंतील सारें अज्ञान दूर करण्याचें तुमचें कर्तव्य होतें; कारण तुह्मांपाशीं सर्वांपेक्षां अधिक ज्ञानाचा संग्रह होता. जगांतील अज्ञान जोंवर समूळ दूर झालें नाहीं, तोंवर ज्ञात्याचें काम शेष राहिलें आहे असें खचित समजलें पाहिजे. प्रकाशानें तम घालवावें आणि ज्ञानानें अज्ञान नाशावें हेंच त्यांचें काम व तें त्यांनीं केलेंच पाहिजे. आपल्या पोराच्या निर्वाहाची तर्तुद न करितां परोपरीच्या विलासांत स्वत:करितां साऱ्या दौलतीचा फडशा पाडावा हें संपन्न पित्याच्या मूर्खपणाचें लक्षण होय; त्याचप्रमाणें सायुज्यपदप्राप्तीकरितां स्वत: झटून पोराबाळांना यमाच्या स्वाधीन करावें, हें तुह्मांस लांछनास्पद होय. तुह्मी आपल्या प्रजेचा परामर्ष घेतला नाहीं किंवा त्यांच्या उन्नतीसाठीं अगदींच झटला नाहीं असें ह्मणावयाचा माझा उद्देश नाहीं; तुह्मींही पुष्कळ केलें व पुष्कळ सांभाळिलें. तथापि ज्याअर्थीं आर्यांची आज अशी दुर्दशा आहे, त्याअर्थीं त्यांच्या आचार्यांचा प्रयत्न हवा होता एवढेंच नव्हे तर पुरेसा प्रयत्न पाहिजे होता; आणि तो तसा नव्हता याची हें कार्यच साक्ष देत आहे. आज तुह्मां आर्यांची जी संतति भरतखंडांत वास्तव्य करीत आहे तिची सर्व प्रकारें शोचनीय स्थिति पाहून आह्माला असें वाटतें कीं तुमच्या कृतींत, तुमच्या उपदेशांत, व तुमच्या धोरणांत राष्ट्रीय दृष्टीनें पाहतां कांहीं महत्वाच्या बाबतींत कांहीं व्यंग कालवशात् उत्पन्न झालें असलें पाहिजे. एरव्हीं ही अवनति कशी संभवेल? एरव्हीं हा ऱ्हास कसा संभवेल? मुळांशीं कांहीं तरी चुकलें असलें पाहिजे; कोठें तरी कोणाकडून कर्तव्याची अक्षम्य उपेक्षा होत असली पाहिजे, याबद्दल आह्मांस तिलमात्र संदेह नाहीं. आणि तुमचीही तशी खात्री झाल्यावांचून राहिली नसेल. खात्री व्हावयास आणखी प्रमाणें तरी किती पाहिजेत. जिकडे पहाल तिकडे अवनति,

औदासिन्य, दैन्य, यांचेंच प्रतिबिंब अखिल वस्तूंवर पडलेलें दिसत आहे आणि वस्तूंच्या निकृष्ट अवस्थेचें प्रतिबिंब तुमच्या कर्मांवर आणि शहाणपणावर उलटलेलें स्पष्ट होत आहे. प्रजेच्या अनार्यत्वावरून तुह्मांलादेखील आर्य ह्मणावें किंवा नाहीं याविषयीं कोणाकोणास संदेह उत्पन्न होत आहे आणि माझ्या मतें तो गैरवाजवी नाहीं. त्यांच्या दुरवस्थेबद्दल सर्वांशीं जबाबदार आहां हें मी तुह्मांस पुन: एकवार स्पष्ट सांगत आहें. जलचरांना ज्याप्रमाणें पाण्याबाहेर जगतां येत नाहीं, तसेंच तुमच्या विचारांतही एके प्रकारची एकविधता उत्पन्न झाली आहे, कीं जिच्या बाहेर तुह्मांस पाहतांच येईनासें झालें आहे. व्यक्तिश: तुमची दिशा, तुमचा उद्देश, तुमचें आचरण फार योग्य आहे, हें तुह्मांस कळविण्यास आह्माला फार आनंद वाटतो; परंतु तुमच्या अनुयायी समाजाच्या कल्याणाचें चिंतन करीत असतांना तुमचें करणें असमंजसपणाचें, अदूरदर्शित्वाचें आणि निर्दयपणाचें, आहे असें साफ सांगावें लागतें. त्याचप्रमाणें तें काळाला आणि वस्तुस्थितीलाही अनुसरून नाहीं. ते त्यांच्यापुढें आहे व ह्मणून त्याच्या उपयोगाचें नाहीं. इतकेंच नव्हे, तर आजच्या समाजाच्या नाशास तें कारणीभूत होत आहे. याचा विचार करा; याचा नीट विचार करा. बाह्यप्रपंचाची तुह्मांला कदाचित् गरज वाटत नसेल; परंतु समाजाचें अस्तित्व, कर्तृत्व आणि भोक्तृत्व प्रपंचाच्या सुस्थितीवर सर्वस्वी अवलंबून आहे आणि प्रपंचाची सुस्थिति तुमच्या प्रेरणेवर अवलंबून आहे. येथें तुह्मांकडून उपेक्षा झाल्यास साऱ्यांना अधोगतीला लाविल्याचें महत्पाप तुमच्या शिरीं बसेल आणि तुह्मांस कालिमा लावील. तुह्मीं जवळ असूनही जर तुमच्या गोत्रजांची, शिष्यांची आणि अनुयायांची दुर्दशा व्हावी; अखंडानंदाच्या प्रवाहांत वहात असलेल्या आचार्यांच्या प्रजेचा नरकरूप दु:स्थितींत प्राणत्याग व्हावा; अनुपमेय, अद्वितीय ब्रह्मसुखाच्या सेवनीं सक्त असलेल्या आत्मज्ञांच्या समागमांत राहूनही भारतीयांच्या कपाळीं फुटकें संसारसुखही पुरेसें असूं नये; योगबलानें ज्यांना आपलें तारुण्य कल्पावधि कायम राखितां येतें, त्या तुह्मां

महायोग्यांच्या कासेला लागूनही आर्यपुत्रांना जगण्याचें साधें सुखदेखील निर्विघ्नपणें मिळूं नये, ही दु:सह स्थिति प्रजेच्या आणि आचार्यांच्या सामाजिक पातकांचें खचित फळ असलें पाहिजे. पातकावांचून असलें दुष्ट फल दुसरें कशाचें असणार? आणि दु:खरूप फलाचें कारण पाप नव्हे असें कसें होईल? लोक अजाण आहेत ह्मणून अजाणपणामुळें त्यांच्या हातून घडलेला अपराध क्षम्य आहे; परंतु तुह्माला क्षमा कशी करितां येईल? तुह्मी सुज्ञ आहां आणि लोकांचा तुह्मावर विश्वास असून तुमच्यामागें चालत येण्यास ते तयार आहेत. तेव्हां लोकांच्या अज्ञानामुळें त्यांचें जें नुकसान होत आहे व त्यांस जें दु:ख भोगावें लागत आहे त्याबद्दल जबाबदार कोण होतो? शरीराच्या प्रत्येक अवयवाला निराळें डोकें नसतें; साऱ्या शरीराला एकच शिर असतें व सर्व अवयव त्यावर अवलंबून असल्यामुळें प्रत्येक अवयवाला तें सारखें अनुकूल असलें पाहिजे हें उघड आहे. तुह्मी जाणते आचार्य समाजांत आहांत; ह्मणून सारा समाजही तुह्मामुळें सुजाण असला पाहिजे आणि त्या जाणतेपणामुळें सुस्थितींतही दिसला पाहिजे. परंतु अनुभव निराळा येतो, यावरून आचार्यवृंद आपलें काम नीट बजावीत नाहीं व लोकांत तो असून नसल्यासारखा आहे हें स्पष्ट आहे. येथें त्या बापुड्यांनीं काय करावें? तुह्मी त्यांजकडे पाहिलें नाहीं तर त्यांनीं कोणाकडे तरी पहावें? पेटीनेंच जर अलंकार गिळिला, मातेनेंच जर मुलाची उपेक्षा केली, समर्थांनींच दुर्बलांचा प्रतिकार केला तर त्या बिचाऱ्यांनीं कोणाचा आश्रय करून सनाथ व्हावें? नका, नका; असें करूं नका. असें तुह्माला करितां येत नाहीं. तुमच्या, तशीच त्यांच्याही उद्धाराची जोखीम तुह्मांवर आहे. ती तुह्मी जाणिली नाहीं आणि आपलें कर्तव्य बजाविलें नाहीं तर, तुह्मांस इतकें पाप लागेल कीं त्याच्या तीव्र ज्वालेनें तुमचें अध्यात्म-सिद्धि-रूप सर्व पुण्य जळून राख होईल. परोपकारार्थ केलेल्या कर्मांनीं ज्ञानी लिप्त होत नाहीं, आणि दीनाच्या संरक्षणीं अकर्म पत्करिल्यास ह्मणजे योग्य तें न केल्यास त्यामुळें साऱ्या तपाचा नाश होईल इतकेंच नव्हे तर मोठें पाप पदरीं येईल.

प्रपंचाचा तिरस्कार करून, तुह्मी देवाचा केवढा अपमान करीत आहां, आणि अजाण समाजांत कसली भयंकर प्रवृत्ति उत्पन्न करीत आहां, आणि त्याच्या उद्धाराचें जें एकच साधन त्याला अनुकूल आहे तें हिराऊन त्यास किती दीन करीत आहां याचा काळजीपूर्वक विचार करा. ही अनेकविध प्रजा, तिनें आत्महत्या करून अकालीं नाश पावावें यास्तव खचित निर्माण केली नसली पाहिजे. आणि ही मनोरम सृष्टि तिचा उच्छेद करून अथवा आपले डोळे फोडून नाहींशी करावी यास्तव उत्पन्न झाली नसावी यांत संशय नाहीं. परमार्थप्राप्तीच्या कार्यांत ती विघ्नें आणिते हा भ्रम आहे आणि वेदवचनांतही या समजुतीस कोठें आधार नाहीं. तुह्मी प्रपंचाचे ताबेदार होऊन गाफीलपणानें त्याच्या प्रवाहांत स्वत्व हरवून वहात मात्र जाऊं नये. त्यास स्वाधीन ठेवावें आणि सुधरावें ह्मणजे त्याच्यासारखा सुख देणारा आणि हित साधणारा दुसरा मित्र नाहीं अशी खात्री झाल्यावांचून राहणार नाहीं. आजपर्यंत मनुष्यजातीचें अपरिमित हित त्यानेंच केलें आहे, आणि अद्यापिही पुष्कळ करावयाचें उरलें आहे. हें सुखाचें आणि उत्कर्षाचें साधन वश केल्यानंतर त्याहून अधिक आनंदाचें आणि उन्नतीचें शाश्वत साधन माणसाला आपोआप सांपडेल. आपल्या दुबळेपणाकरितां माणसानें प्रपंचाला पाजी ठरवून दौर्बल्य दूर करण्याचें प्रमुख साधन, स्वहित इच्छिणारानें गमाऊन बसावें आणि विषभ्रमानें अमृताचा तिरस्कार करावा हें योग्य नव्हे इतकेंच नाहीं, तर उलट घातक आहे. सिद्धाखेरीज सर्व सामान्य जनांनीं प्रपंचाची जीवासारखी आणि जीवाकरितां जपणूक केली पाहिजे, आणि सामान्य लोकांचीही, त्यांच्या सुखाच्या आणि ज्ञानाच्या सृष्टिरूप आणि आचाररूप सामग्रीसह, आचार्यांनीं जपणूक केली पाहिजे. आपल्या लोकांची उपेक्षा करून आचार्य कृतकार्य कसे होतील? ऐहिकमोक्षरूप इष्टस्थितीचा यथेच्छ उपभोग घेतल्यानंतर पारमार्थिक मोक्षाच्या अत्यंत इष्ट पदवीस पोहोंचवून साऱ्या जगताचें सारें कार्य कायमचें साधून देईपर्यंत आचार्यांचें कर्तव्य तडीस जाणार नाहीं, ह्मणून स्वतःचें आत्मोन्नतिरूप कर्तव्य साध्य करण्यासाठीं पाहिजे असलेल्या साधनांची तयारी करणें

आचार्यांना जितकें जरूरीचें आहे तितकेंच योग्यतेनें हीन असलेल्या सामान्य लोकांच्या उद्धाराचीही सर्व सामग्री त्यांनीं सज्ज ठेवणें जरूर आहे; तसेंच स्वत: करितां स्वत: प्रयत्न करण्याची त्यांस जितकी अवश्यकता आहे, तितकीच, दुसऱ्यांनीं आपापल्याकरितां प्रयत्न करावा ह्मणूनही आचार्यांनीं तसाच आस्थापूर्वक प्रयत्न करण्याचीही अवश्यकता आहे. तें लोकांचें काम आहे ह्मणून आचार्यांना तें परकें होत नाहीं. आचार्यांच्या पोटांत लोक वसत असल्यामुळें लोकांचें कार्यही आचार्यांचें कार्य होतें. शिवाय संसाराच्या सहवासापासून, सृष्टीच्या संशोधनापासून शक्तीच्या चालनापासून, समाजाच्या सुस्थितीपासून, राष्ट्राच्या उन्नतीपासून, स्वभावाच्या संस्कारापासून, शिक्षणाच्या प्रसारापासून, जेवढें प्रचंड कार्य उत्पन्न व्हावयाचें आहे, तेवढें झालें असें आचार्यांनीं बिलकुल समजूं नये. अद्यापि पुष्कळ गोष्टींची सीमा सांपडावयाची आहे; तत्वांचें व्याकरण व्हावयाचें आहे; शक्तींचा उत्कर्ष दिसावयाचा आहे. इतक्यांत आचार्यांनीं हातचें धनुष्य खालीं ठेवूं नये. प्रभूची सृष्टि अपार आहे, त्याची सत्ता अगाध आहे, आणि तत्वाचा विस्तार अतर्क्य आहे. माणसानें आजच त्यांचा अंत लागला असें मानून चेतनाचेतन जगताचा संग सोडणें आणि शोध, प्रगति, आणि कर्म इत्यादि श्रेयस्कर साधनांचें विसर्जन करणें हें त्याच्या उद्दामपणाचें लक्षण होय. त्यांत प्रभूचा अपमान होतो आणि स्वत:ची गति कुंठित होऊन अहित होतें. तुह्मांला जेथें जगताचा अथवा तत्वांचा अंत दिसला तेथेंच त्यांचा वास्तविक अंत झाला नाहीं आणि तुमच्या कल्पनेला जेवढें कल्पितां येत होतें तेवढें जरी तुमच्या शक्तीला साध्य होतें; तथापि तुमच्या कल्पनेची जेथें पोंच होत नाहीं, असा भाग राहिला नाहीं असेंही नाहीं. आचार्यांनीं जें साधिलें आहे तें थोडें नाहीं हें खरें; परंतु तें सर्व नसून पदार्थांची व्याप्ति शास्त्राचें रहस्य, संसाराचें गुज, शक्तीचें सामर्थ्य, आणि आत्म्याचा अथवा प्रभुत्वाचा प्रभाव अद्यापि त्यांस उमजावयाचा बराच अवशिष्ट राहिला आहे हें मी तुह्मांस सांगते आणि कल्याणकर कर्मांपासून पराङ्मुख करणाऱ्या विनाशकर भ्रमांतून तुह्मांस वेळेवर सावध करिते. अवज्ञा झाल्यास

प्राणांत होईल हें ध्यानांत ठेवा आणि योगारूढ होऊन संपूर्ण आधिभौतिक आणि अध्यात्मिक विषयांचा समाचार घ्या. प्रत्यक्ष प्रभू तुह्मांपाशीं येऊन व तुमची पाठ थोपटून ' येथें संपलें ' असें सांगेपर्यंत, प्रत्येक मनुष्य प्रतिविश्वकर्मा बनेपर्यंत, समर्याद मनुष्यभाव गळून प्रभूच्या अमर्याद भावाप्रत तो प्राप्त होईपर्यंत, आणि सत्ता, सुख, शांति आणि ज्ञान यांचा अखंड जयजयकार होईपर्यंत हातचें कर्तव्य सोडूं नका. हिंदु ह्मणवून घेण्यांत अद्यापि बहुतांना अभिमान वाटत आहे व तुह्मां विषयीं अद्यापि बहुतांच्या मनांत चांगली पूज्य बुद्धि वसत आहे; तेव्हां सांप्रत निराश होण्याचें कारण नाहीं आणि कर्तव्यशेष राहील तोंवर आशा, उत्साह, धैर्य आणि दक्षता लेशमात्रही खचूं देतां उपयोग नाहीं. तुह्मीं सुज्ञ आहां, चतुर आहां, अनुभविक आहां, आस्थावंत आहां, धीर आहां आणि योजकही आहां. फार विस्ताराची तुह्मांस गरज नाहीं. नुसता अंगुलिनिर्देशही तुह्मांस पुरे आहे याविषयीं शंका नाहीं. परंतु प्रस्तुत अशा निर्देशाची आवश्यकता उत्पन्न झाली आहे हें आतां तुमच्यादेखील लक्षांत येऊन चुकलें असेल. घडलेल्या दुष्परिणामाबद्दल, झालेल्या हानिबद्दल, तुह्मांस अत्यंत खेद वाटत असेल. आणि सहज समाधि मोडून आतां लोकहितार्थ यत्न करण्यास्तव उद्युक्त व्हावें अशी प्रेरणा तुमच्या अंतःकरणांत उत्पन्न होऊं लागल्याचीं चिन्हें आह्मांस स्पष्ट दिसत आहेत; आणि तशी संधि पाहूनच मी तुह्मांस जागें करून उत्तेजन देण्याकरितां प्राप्त झाले आहे. आतां विलंब करूं नका. तुमची सर्व तयारी आहे हें प्रसिद्ध आहे. ज्ञान, नीति, चातुर्य, योजना, मानसिक आणि शारीरिक सामर्थ्य इत्यादि अनेक प्रकारची इष्ट सामुग्री तुमच्या हाताशीं तयार आहे. तुह्मास फक्त दिशा पालटावयाची आहे. परमार्थ-पथापासून तुह्मांस बालाग्रही ढळावयाचें नाहीं; परंतु तुमच्या वंशजांना व त्यांचे बरोबरच जगांतील सर्व माणसांना स्वत्वापासून पदच्युत न होऊं देतां त्यांस सुखाचा, सुस्थितीचा, आणि तत्वावबोधाचा अनुभव घडवून द्यावयाचा आहे. तुह्मी एकटेच मुक्त होऊं नका. घडीभर उशीरानें व्हा; परंतु सर्वांस पंक्तीला घेऊन व्हा. परमार्थांत प्रपंच करूं नका. त्यांत

केवळ स्वार्थ साधूं नका. साऱ्या दुर्बलांना हातीं धरा. घट्ट पोटाशीं धरा, आणि त्यांशीं सहवर्तमान जगाला सोन्याचे, अमृताचे, दिवस दाखवा. तुह्मा समर्थांच्या आणि सुज्ञांच्या सत्वाची व्याप्ति फार मोठी आहे हें विसरूं नका. तुमचें स्वत्व मनुष्यजातीच्या विस्ताराएवढें विस्तृत आणि स्वभावाच्या खोलीइतकें गहन आहे. कोठें कोणी एक प्राणी जरी, दीन, दुर्बल, अज्ञ आणि परतंत्र राहिला तरी तुमचें कर्तव्य शिल्लक आहे असें समजा. यच्चयावत् मनुष्यजातीच्या तुह्मी समुदाय-वाचक व्यक्ति आहा. त्या सर्वांची सुधारणा ह्मणजे तुमचें कर्तव्य, त्या सर्वांचा जीव मिळून तुमचा जीव. त्या सर्वांचे देह त्यांत एक अंश जरी हीन राहिला अथवा त्यांत कोठें कोणतेंही व्यंग उरलें, तरी तुमची कार्यसिद्धि अपूर्ण राहिली असें खचित समजावें. सर्वांचें सारखें कार्य घडून आलें, सर्वांस सारखी सायुज्यता प्राप्त झाली ह्मणजे तुमचा कार्यभाग आटोपला. ज्ञानाच्या अमूल्य देणगीमुळें भूलोकांवर देवाचें प्रतिनिधित्व तुह्मांकडे आलेलें आहे अथवा दिलेलें आहे व त्यांस स्मरून आपलें कर्तव्य जगाच्या अंतापर्यंत दक्षतेनें तुह्मास बजाविलें पाहिजे अशी तुह्मास आमची आज्ञा आहे. तूह्मी प्रभूचे प्रेषित आहां आणि जगदुद्धाराचें महत्कार्य तुह्मावर सोंपविलें आहे. तें पुन: सरसावून हातीं घ्या, आणि देश, काल, आणि वर्तमान, यांचा पूर्ण विचार करून आपल्या प्रयत्नाची दिशा फिरवा. सत्य त्रिकाला-बाधित आहे हें खरें व त्याचा आश्रय करणें श्रेयस्कर आहे हेंही खरें; परंतु त्याच्या आग्रहगर्तेत गुंतून पडूं नका. सत्य साधून देत असतांना अधिकार आणि परिस्थिति यांचें धोरण सुटूं नये. दुबळ्यांना जन्मजन्मांतरीं सोडूं नका, आणि त्यांना घेऊन चालूं लागाल, तेव्हां सत्याचें देखील कालानुसारित्व पहा. लोकस्थितीशीं त्याचा मेळ घाला; लोकहिताशीं त्याचा मिलाफ करा. चांगलें तें चांगलें खरें; परंतु सर्व काळीं, सर्व स्थळीं, आणि सर्व प्रसंगीं, तें सारखेंच चांगलें अथवा हितकर असतें असें नाहीं. तुमचें इष्ट फल तें खरें; परंतु इष्टराशिकाप्रमाणें कल्पित संख्या घेऊन पुष्कळ वेळां गणित करावें लागतें. तुह्मांला सत्याचा अथवा श्रेयस्कराचा अपलाप करावयाचा नाहीं; फक्त अधिकारभेद पहावयाचा आहे; फक्त स्थितिभेद

पहावयाचा आहे; आणि कुशल वैद्य जसा रोगानुसार पृथक् औषधांची योजना करितो, त्याप्रमाणें योग्यता आणि समय पाहून उपदेशाचें धोरण ठेवावयाचें आहे. महदाकाश वास्तविक आहे, ह्मणून आमच्या क्षितिजाच्या मर्यादेंत सामावलेलें खंडित आकाश नव्हे असें कसें ह्मणतां येईल? खंडित दृष्टीच्या अनुरोधानें तिच्यापुरतें आकाशही खंडित झालें. त्याचप्रमाणें ज्ञानाचेंही आहे. सत्य वस्तुचे अंशही पूर्णवस्तु इतकेच सत्य असतात आणि आकलन शक्तीच्या प्रमाणानें अंशा अंशानेंच सद्वस्तुही हस्तगत होईल आणि तशीच ती करून दिली पाहिजे. तेव्हां कालाचा, वस्तुस्थितीचा व लोकांच्या योग्यतेचा विचार करा; व सद्य: स्थितीस अनुसरून पण उत्तम स्थितीस पुढें नेऊन पोहोंचवितील असे मार्ग शोधून काढा. शिक्षणानें, उपदेशानें आणि प्रेमानें लोकांना तिकडे वळवा. झोंपेंत व अज्ञानांत कोणीही सजीव माणसास मग तो स्वदेशीय असो अथवा विदेशीय असो राहूं देऊं नका. पालटलेल्या कालमानाचे लोकशिक्षणाच्या कामीं नेहमीं धोरण ठेविलें पाहिजे. कालगतीशीं विपरीत अशा दिशेनें गेल्यास प्राणनाश होईल आणि प्राणाच्या व स्वातंत्र्याच्या नाशाहून कोणतीही हानि मोठी नाहीं. समाजाची व राज्याची अशा उत्तम पायांवर स्थापना झाली पाहिजे. व त्यास कालानुसार असें वळण देत गेलें पाहिजे कीं, चंद्र, सूर्य आहेत तोंवर त्यांनीं अभंग रहावें इतकेंच नव्हे तर त्यांची निरंतर सरशी व जयजयकार होत असावा. सर्व धर्माचरणाचें आद्य साधन जें शरीर तें अगोदर सांभाळिलें पाहिजे व सदृढ केलें पाहिजे. शरीराचें शरीर समाज होय; तेव्हां धर्मसाधनभूत लहान शरीराच्या संरक्षणासाठीं समाजरूपी विराट शरीराचें सर्वांच्या आधीं संरक्षण झालें पाहिजे. उभय शरीरांचा उत्कर्ष त्यांतील चैतन्याच्या सुस्थितीवर अवलंबून आहे. यासाठीं व्यक्तींना उत्तम शिक्षणानें सद्गुणी, कार्यवादी, अभिमानी, ज्ञानी, व चतुर, केलें पाहिजे. सर्व शकट मोठ्या बंदोबस्तानें, युक्तीनें व चातुर्यानें हाकला पाहिजे; व दूरदर्शीपणानें पद्धति अशा घालून दिल्या पाहिजेत कीं, जेणेंकरून कोणत्याही प्रकारचा

त्यांत कधींही व्यत्यय अथवा विघ्न येऊं नये व सर्व कालीं शक्ति, मति, धृति, नीति, युक्ति व संपत्ति यांचा अखंड उत्कर्ष होत असावा.

आज या ठिकाणीं तुह्मा सर्वांना बोलावण्याचें कारण असें आहे कीं, या विषयाचा या दृष्टीनें सर्वांनीं मिळून विचार करावा व भरतभूमीचा अभिमान बाळगणाऱ्या तुमच्या सर्व अनुयायी मंडळींच्या हितार्थ मागल्या चुकीची दुरुस्ती करून अवश्यक निर्बंध घालून द्यावे व व्यापक पद्धति स्थापन कराव्या. कालस्थिति पालटल्यामुळें व सांप्रत लोकांची योग्यताही क्षीण झाल्यामुळें विशेष अधिकाराला शोभणारा पूर्वीच्या निर्बंधांतील चांगुलपणा कमी केला पाहिजे. तात्पर्य निर्बंध जे पाहिजेत ते कालस्थितीला व लोक-योग्यतेला अनुरूप असून स्थिति सुधारणारे व योग्यता वाढविणारे असे असावेत. एवढ्यानेंच तुमचें कार्य संपलें नाहीं. तुह्मां सर्वांना आमची अशी ताकीद आहे कीं, तुह्मीं आपल्या कार्यीं निरंतर दक्ष राहून भाषणानें व आचरणानें असमंजस जनाचें खरें हित कशांत आहे याविषयीं त्यांची समजूत घालीत जावें व कालानुरूप हितकर मार्गानें चालण्याविषयीं त्यांचे ठिकाणीं उत्साहयुक्त प्रवृत्ति उत्पन्न करावी. व्यवस्था सांगून आणि लावून दिली ह्मणजे कार्य आटोपलें असें बिलकुल समजूं नये. ती सतत चालू राखण्याविषयींही सतत दक्ष राहिलें पाहिजे. उपदेशकावर, चालकावर, अथवा सुज्ञावर मोठी जबाबदारी आहे तीस ओळखून त्यांनीं अहोरात्र जागें व सावध राहिलें पाहिजे. त्यांनीं सतत कार्य-दक्ष असलें पाहिजे. कार्याच्या अस्तित्वापर्यंत कारणाची गरज आहे. अज्ञान, दुःख, दैन्य, आणि पराधीनता दूर करून ज्ञान, सुख, समृद्धि आणि स्वातंत्र्य यांचा सर्वांस सारखा लाभ होईपर्यंत त्यांनीं काळजीपूर्वक प्रयत्न केला पाहिजे; व प्राप्तीनंतर मिळविलेलें सतत सांभाळण्याकरितांही तसाच कळकळीचा उद्योग कायम ठेविला पाहिजे. काम विस्तीर्ण आहे तसाच कालही पण अफाट आहे व धोरण आणि दक्षता हींही तशींच विपुल पाहिजेत. साऱ्या मानवजातीची तुह्मापाशीं ठेव ठेविली आहे, तिचा प्रेमपूर्वक सांभाळ करणें तुमचें कर्तव्य आहे. तथापि त्यांतल्या त्यांत भरतखंडांतील माझ्या सात्विक लेंकरांचा तुह्मीं

अधिक आस्थेनें प्रतिपाल करा. जगांतील इतर राष्ट्रें व त्यांतील लोक आपापल्या समजुतीप्रमाणें स्वार्थाविषयीं थोडेबहुत दक्ष आहेत. परंतु भरतवर्षांतील प्रजाजन भोळा, सालस, प्रामाणिक, हूड, आणि गाफील आहे. त्यांजकडे आधीं आणि अधिक लक्ष पुरवा. त्यास आधीं सुशिक्षित, सुदृढ, आणि संपन्न करा. त्यांस सर्वांच्या बरोबर आधीं आणून बसवा आणि नंतर सर्वांच्या उद्धाराची सारखी काळजी घ्या. जुन्या सत्संकारांनीं ज्यांच्या रक्ताचे परमाणु भारलेले आहेत व अनेक स्थित्यंतरांनीं संकीर्ण अशा उच्चनीच दशेंतून पार पडून ज्यांनीं एकवेळ पृथ्वीप्रदक्षिणा केली आहे, त्या भारतीयांची आज किती जरी विषम दशा असली तथापि तुमचें शिक्षण ते वायां जाऊं देणार नाहींत इतकेंच नव्हे, तर त्यांत तें तुह्मास तत्काल यश देतील. तुमच्या उद्योगाचें भरतखंड केंद्रस्थान कल्पून साऱ्या पृथ्वीला सावकाश आळा घाला. कारण जगदुद्धाराच्या महत्कार्याला लागणारें प्रचंड शक्तिरूप चैतन्य, भूमंडलावरील तमाचें आवरण उडवून टाकणाऱ्या सूर्याच्या अंगच्या अखंड तेजाप्रमाणें आर्यावर्तांतच उसळून उत्पन्न होईल. तें इतकें कीं, साऱ्या जगतानें त्यांवर खुशाल आपला निर्वाह करावा, आपलें ऐश्वर्य यथेच्छ वाढवून आणि आपणास प्रभूच्या इच्छेप्रमाणें कृतार्थ करून घ्यावें.

प्रिय पुत्रांनो! आशेनें युक्त आणि उत्साहानें पूर्ण तुमचीं अंतःकरणें पाहून आणि तशींच तुमच्या चर्येवरील प्रसन्नता अवलोकन करून आह्मांला परमावधीचें समाधान होत आहे; आणि ज्या कार्यासाठीं तुह्मीं आज येथें जमला आहां तें तुह्मांकडून यथास्थित तडीस जाईल असा भरंवसा वाटत आहे. तुमचे मनोरथ परिपूर्ण होतील. जगाच्या उद्धाराचें दुर्घट कार्य तुमचे हातून निर्विघ्नपणें तडीस जाईल; तुमच्या आर्यवंशाचा विजय आणि उत्कर्ष होईल; भरतवर्षाला आणि त्याबरोबर साऱ्या जगाला सोन्याचे दिवस दिसतील आणि ऐहिक मोक्ष प्राप्त होऊन अंतीं प्रभूच्या मंगलधामीं वास्तव्य मिळेल हा माझा तुह्मांस पूर्ण अशीर्वाद आहे.

आतां थोडक्यांत उपोद्घात रूपानें व्यासमुनि पूर्ववृत्तांत सांगतील व आज जें काम करावयाचें आहे त्याची दिशा सुचवितील, तिकडे सर्वांचें अवधान असावें.

त्यानंतर आज्ञेप्रमाणें **वेदव्यास** उठून उभे राहिले आणि भाषणास आरंभ केला. ते ह्मणाले:—तपोनिधि महर्षि आणि राजर्षि यांसि; ईश-प्रेरणेस अनुसरून आपण या पुण्यप्रद भरतभूमातेचें पुत्रत्व अंगीकारिल्यास आज जवळ जवळ सहा हजार वर्षें होत आलीं. धर्म, अर्थ आणि काम, या तिन्ही पुरुषार्थांची प्राप्ति व्हावी या उद्देशानें सर्व अंगांचा विचार करून इष्टफलदायक पद्धती स्थापन केल्या. आपला अनुभव, ज्ञान, तप वाढत चालले त्या मानानें त्या पद्धतींत सुधारणा करीत चाललों व एके कालीं विपुल संतति, अतुल संपत्ति, सार्वभौम राज्य, चौदा विद्या, चौसष्ट कला, अखंड शांति व अपार सौख्य, यांचे आधिपति होऊन बसलों.

प्रथम युद्धपर्व समाप्त झाल्यानंतर उद्योगपर्वाला आरंभ झाला. युद्ध कालीं जे गुण असतात ते उद्योग कालीं अवगुण होतात आणि उद्योग-कालीं जे गुण ह्मणून मानिले जातात, ते धर्मकालीं अथवा परमार्थकालीं अवगुण ठरतात. तेव्हां उद्योगांत पूर्ण यशःप्राप्ति व्हावी, एतदर्थ युद्धकालीं हितकर वाटून पोसलेले कांहीं गुण नंतर बाधक होऊं लागले ह्मणून काढून टाकून उद्योग-वृद्धीस अनुकूल गुण संपादन करून घेतले. न्याय-पद्धती स्थापन केल्या; कलाकौशल्यास उत्तेजन मिळालें; शास्त्रीय शोध सुरू झाले; शिक्षणाचा प्रसार केला, धर्माची संस्थापना केली, आणि राज्याचा बंदोबस्त केला. सत्ता, सुख आणि ज्ञान यांचा यथेच्छ उपभोग घेतला, व सर्व मनोरथ यथास्थित परिपूर्ण करून घेतले. ऐहिक मोक्ष साध्य करून घेतला. उद्योगसिद्धि झाल्यानंतर यथाक्रम शांति-पर्वाला आरंभ होऊन आत्मसिद्धीविषयीं साहजिक उत्कंठा उत्पन्न झाली, व त्या उद्योगाला आरंभ केला. युद्ध आणि उद्योग या दोन्ही कालीं ज्या मनोवृत्तींनीं आणि साधनांनीं समाजाचें पुष्कळ हित केलें, ज्यांनीं

त्यांस त्यावेळीं जगविलें व ज्यांनींच समाजाला या सुखाच्या स्थितीस आणून पोहोंचविलें, तीं सर्व आतां शत्रुसारखीं दिसूं लागलीं. त्यांचा क्रमाक्रमानें निरास केला. व्यवहार पेठेंतील संपत्तीपेक्षां परमार्थ पेठेंतील दारिद्र्य अधिक सुखदायक असतें, भोगानंदापेक्षां त्यागानंद विशेष असतो असा अनुभव आल्यानंतर संसाराचा त्याग केला. शास्त्रांच्या तंत्रानें ज्ञानेंद्रियांच्या खटाटोपापासून प्राप्त झालेलें ज्ञान समर्याद आणि मायिक असून केवळ ज्ञान आत्मसाक्षात्कारापासून होतें, अशी खात्री झाल्यानंतर शास्त्रांचा आणि शोधसामग्रीचा परित्याग करून अंतर्मुख बनलों. शम, दम, तितिक्षा इत्यादि साधनांनीं पूर्वसंस्कारजनित सर्व दोष जाळून कमलपत्रावरील हिमबिंदुप्रमाणें अंतःकरण निर्मल केलें, योगसाधनांनीं त्यास सबल करून त्याचें ऐश्वर्य वाढविलें व सच्चिदानंद स्वरूपांत विलीन होऊन सायुज्य पदाची जोड केली.

आर्यांचें वेदांतशास्त्र व मोक्षमार्ग अप्रतिम आहेत; स्वरूप, कर्तव्य आणि सिद्धि यांचें यथार्थज्ञान करून देणारे आहेत; यांत संशय नाहीं. साऱ्या जगांतील शाहण्या माणसांना त्यांनीं चकित करून सोडिलें आहे, व जगाच्या इतिहासांत असा एक काळ खचित येईल कीं, जेव्हां आर्यांच्या वेदांतसिद्धांतांची सर्वांस गोडी लागून ते सर्वमान्य होतील. असो.

आचार्यांनीं सर्वसंगपरित्याग केला, कडकडित वैराग्य धारण केलें, आणि मोक्षचिंतनांत निमग्न होऊन ते ध्यानस्थ बसले. आचार्य ब्रह्मवेत्ते ह्मणून, लोक अडाणी कमी होते असें नाहीं. त्यापैकीं कांहींनीं समजत नव्हतें तरी भाविकपणानें परमार्थाची वाट धरिली व बाकीच्यानीं चैनीस आरंभ केला. दोन्ही बाजूनीं दोहो वर्गांतील लोक व्यवहाराचे व राज्यरक्षणाचे कामीं निरुपयोगी होत चालले. त्या कामीं लागणारे गुण एका मागून एक गळून जाऊं लागले. वर्णव्यवस्थेमुळें तीन वर्णांस शिपाईगिरी मुळींच माहित नव्हती. राहिलेल्या चौथ्या क्षात्रवर्गाचा भारतीय युद्धामध्यें अक्षौहिणींनीं निःपात झाला होता. अंतर्गत कलहाचा निरास झाल्यामुळें शांतता सर्वत्र होती व निर्वाहाची पंचाईत

मुळींच नव्हती. सर्वांना सुख व परमार्थच पाहिजे होता व त्याच वाटांनीं बहुतेक निघाले होते. स्वतःच्या सौजन्यामुळें दुष्टाच्या अपकाराची कांक्षाही नव्हती. तेव्हां जिकडे तिकडे अनायासेंच शिथिलता येत चालली. आर्यांच्या दैवगतीमुळें प्रसंगास ओळखून आचार्यांकडून बंदोबस्त झाला नाहीं. इतक्यांत वायव्येकडून एक धक्का आला. त्यांतून सावध होऊन आहोंत कोठें व कमी काय आहे याचा विचार करूं लागतात, तोंच दुसरा व तिसरा येऊन पोहोंचला. युद्धकाल मागें टाकून दिवस फार झाले होते व शांतिपर्वाचा उपभोग घेत, व फावल्या वेळीं परमार्थाची चर्चा करीत लोक स्वस्थ होते. प्रसंगाला पुढारी तयार नव्हते व अनुयायी तर मुळींच नव्हते. आवरेनासें झालें व होतां होतां सर्व लयास गेलें. आचार्यांनीं समाधि विसर्जन केला व सर्व जन दातीं तृण धरून परवशतेच्या बिडींत अडकलेला अवलोकन केला!

सुवर्णभूमींत सुखाला काय कमी? कल्पनेचीं दुःखें वाटल्यास कोणी उत्पन्न करो, व त्यांतून मुक्त होण्याची वृथा खटपट करो. परंतु आधिभौतिक दुःखास येथें थाराच नव्हता. जिकडे तिकडे सुखच सुख कोंदाटलें होतें. सुख ही तशीच वस्तु आहे व तिच्या प्राप्तीकरितां जीवानें जीवापाड झटणें व प्राप्त झाल्यानंतर तिच्या सेवनांत सदैव दंग राहणें देहस्वभावास अगदीं अनुसरून आहे; परंतु सुखांतही सारेंच सुख नाहीं. त्यांत हीण आहे. गाफलपणा झाला असतां त्याच्या पोटीं जबरदस्त दुःखाचें बीज आहे. कारण सुखाचे पाठोपाठ शिथिलता उत्पन्न होते, शिथिलतेपासून कर्तव्याची हानि होते आणि कर्तव्यहानीपासून नाश होतो. जसें सुखाकरितां सारें कर्तव्य आहे, तसेंच साऱ्या कर्तव्यांतही सुख वाटलें पाहिजे. तेथें जर कां एकदां चुकण्यास आरंभ झाला, आणि कर्तव्याची अनास्था होऊन सुखाचें उद्योगाशीं वांकडें पडूं लागलें ह्मणजे दुर्दैव कोणकोणत्या दुःखाच्या गर्तेत नेऊन घालील, याचा, इजिप्त, ग्रीस, रोम इत्यादि मोठ्या राष्ट्रांच्या मोठ्या अपकर्षावरून चांगला अजमास करितां येतो. लढाई चालू असतांना शिबिरांत रात्रीच्या वेळीं स्वप्नांत देखील सावध राहून शूर शिपायी लढाईच करीत

असतो; परंतु जयप्राप्तीनंतर त्याचा जीव खालीं पडतो, आणि तीन तीन दिवस झोंपेंत सारखा गुंग होऊन राहतो. तात्पर्य, केवळ सुखसेवनाचे परिणाम दुःखानुभवापेक्षांही भयंकर होतात, व ते तसे न व्हावे ह्मणून कर्तव्याचीं बंधनें सर्व काळ सुदृढ राखावीं लागतात. अशा सुखाच्या अवस्थेंत एकेकाळीं सर्व हिंदुसमाज राहूं लागला. तेणेंकरून सुखप्राप्ती करितां झटत असतांना जे गुण आणि दुर्गुण त्याच्या अंगीं उत्पन्न होऊन सुखास साध्य करीत होते, ते त्याच्या प्राप्तीनंतर, कारण सरल्यामुळें हळू हळू लुप्त होऊं लागले. पुढील परमार्थसाधनासाठीं भूमि तयार होऊं लागली व त्या कार्यास पाहिजे असलेले गुण उत्पन्न होऊं लागले. शरीराचीं कसलेलीं दृढबंधनें सैल पडलीं, मनाचे परमाणु विरल झाले, तरतरी, राकटपणा, आवेश, चापल्य, धोरण, इत्यादि तीव्र गुण अस्तास चालले आणि त्या अस्ताच्या पोटीं शांति, आर्द्रता, स्थैर्य, मृदुता, इत्यादि सात्विक लक्षणांनीं युक्त अशा शीतल शशिमंडलाचा उदय झाला. हें उत्क्रमण अगदीं स्वाभाविक आणि अगदीं प्रासंगिक झालें. व्यवहाराची सारी हौस पुरली असतांना अंतःकरण अंतर्मुख झाल्यावाचून कसें राहील? याप्रमाणें समाजाचा आत्मा समाधिसुखांत रममाण झाला आणि समाजरूपी स्थूल शरीर सुखाच्या आणि चैनीच्या उपभोगानें नादान आणि निर्जीव बनत चाललें. घरांत याप्रमाणें उतरती कळा लागली. मृगया करून आल्यानंतर धनुष्याची दोरी सैल करून ठेवावी लागते; तशी कार्यभाग समाप्त झाल्यावर आर्यांनीं अंतःकरणें शिथिल करून ठेविलीं आणि सुखाच्या सरोवरांत खुशाल तरंगत पडले. सुखाचा असा स्वभाव आहे कीं त्यानें जेथें जावें तेथून कपट, कठोरपणा, दक्षता, आवेश, निग्रह, इत्यादिकांस घालवून द्यावें आणि तेथें विश्वास, दया, ममता, इत्यादि सात्विक गुण उत्पन्न करावे. याप्रमाणें आर्यपुत्रांच्या शिथिल शरीराला अनुरूप असें त्यांचें मनही शिथिल व कोमल होत चाललें. भरत-वर्षांत सत्वाचें साम्राज्य स्थापन झालें होतें तथापि बाहेर दुनिया दुष्टांनीं गजबजलेली होती. त्यांच्या मत्सराला आणि लोभाला डोळे फुटून, थोड्या आयासानें फार लाभाच्या इच्छेनें ते आपणावर झडप घालतील, अशी स्वाभाविक सद्बुद्धीमुळें, येथें कोणा-

च्याही मनांत शंका आली नाहीं आणि ह्मणून त्यासंबंधाच्या बंदोबस्ताची कोणतीच तयारी नव्हती. उलट रिकामपणामुळें घरांत द्वैत उत्पन्न होऊं लागलें. सर्वांचा एक जीव, एकोपा, राहिला नाहीं. याप्रमाणें अनर्थाची अनेक बाजूंनीं तयारी होत होत, शेवटीं बुडबुड्या-प्रमाणें बाहेरून सुरेख रंगीबेरंगी दिसणारा परंतु आंतून पोकळ झालेला फुगा टिचकी सरसा फुटून गेला. झालें! शेवटीं आर्यांचा वैभव–भानु मावळला; समाजाची घडी बिघडली; सारीं माणसें धुळीसारखीं दश-दिशेनें उडाली; जिकडे तिकडे काळोख पडला; आर्य भूमीला पातकी ग्रहाच्या छायेनें ग्रासून टाकिलें.

या आर्यप्रजेच्या अपकर्षाबद्दल आपण सर्वस्वी जबाबदार आहों, ही गोष्ट निरभिमानपणें आपणांस कबूल करणें भाग आहे. आपणाकडेस कमीपणा येतो खरा; परंतु आजच्या बिकट प्रसंगीं अभिमान बाळगण्यापेक्षां नम्रपणें कमीपणा पत्करणें हेंच युक्त आहे. भ्रष्ट झालेली वस्तुस्थिति स्पष्ट दिसत आहे व ती या वाईट थराला आली एवढ्यावरूनच आपण आपल्या कर्तव्याची उपेक्षा केली, हेंही स्पष्ट होत आहे. आतां अभिमान धरण्यांत अर्थ नाहीं; नाहींतर गैरसावधपणामुळें पूर्वीचें गेले आणि आग्रहामुळें पुढचें साध्य होणें ही अशक्य होईल. प्रजा नेहमीं अजाणाची बनलेली असते. तिचें हित तिला पाहतां, आणि साधितां येत नाहीं आणि ह्मणून पुढाऱ्यांनीं अथवा आचार्यांनीं तिच्या कल्याणाविषयीं सर्वकाल दक्ष असावें लागतें. समाजाचें साहाय्य घेऊन समाजाला योग्य स्थिति आणून देण्याचे आणि आल्यानंतर ती अचल राखून तिचा उत्कर्ष व्हावा अशी व्यवस्था ठेवण्याचें काम आचार्यांचें आहे व तें त्यांनीं सतत केलें पाहिजे. समाजाला सुस्थिति प्राप्त होणें प्रयत्नाअंतीं शक्य आहे, व ती कायम राखणेंही तितकेंच शक्य आहे. असें असतांना भारतीयांचें पूर्ववैभव स्वप्नाप्रमाणें कां झालें? ज्या समाजांत मिळविण्याचे आणि वाढविण्याचे गुण होते तो असा कसा भ्रष्ट झाला आणि सारी कमाई बुडवून बसला? एवढ्या थोरल्या ऐश्वर्याची अशी कशी वाफ होऊन उडून गेली? असें

झालें तरी काय कीं जेणेंकरून एवढी मोठी अनिष्ट क्रांति घडली? असें अगोदर व्हावें कां, हा मुख्य प्रश्न आहे व त्याचें उत्तर शोधिलें पाहिजें. कर्तव्य यथास्थित घडत होतें ह्मणून जर यशःप्राप्ति होत होती, तर तेंच कर्तव्य अन्यथा घडत असेल अथवा त्याची उपेक्षा होत असेल ह्मणून अपमानकारक अपयश पदरीं पडत असलें पाहिजे. पण लोकांचें कर्तव्य यथास्थित कशामुळें घडत होतें? लोक तर अजाण; त्यांना विपरीत आणि सुपरीत हा भेद समजत नाहीं; मग यशदायक युक्ताचार त्यांचे हातून कसा घडला आणि त्यांचा उत्कर्ष कशामुळें झाला? अर्थात् सुज्ञ आचार्यांच्या पुण्यप्रद सहवासामुळें आणि त्यांच्या अर्थप्रद उपदेशामुळें. हें जर खरें आहे तर हेंही खरें असलें पाहिजे कीं, सांप्रतचा अपकर्ष त्याच आचार्यांच्या सहवासाच्या आणि उपदेशाच्या अभावामुळें, अयुक्ततेमुळें अथवा विपरीतत्वामुळें घडून आला असावा. ही गोष्ट नाकबूल करितां येत नाहीं. राष्ट्राचें सारें ऐश्वर्य व त्याचें राष्ट्रपण कायम राखण्याकरितां खरेदीच्या किंमती इतकीच मोठी किंमत द्यावी लागते. पराक्रमानेंच ऐश्वर्य प्राप्त होतें आणि तें राखण्याकरितांही तितकाच पराक्रम लागतो. सतत उद्योग, सारखी दक्षता, निःसीम कर्तव्यप्रीति, प्रसंगावधान, स्वस्थितीचें अचुकज्ञान, जगाच्या स्थितीचें विलक्षण धोरण, सावधपणा चातुर्य, लोककार्याशीं आचार्यांच्या प्राणाचें आणि विचाराचें तादात्म्य आणि लोकांना अब्रूची चाड, इत्यादि अनेक गुणांनीं भाग्य संपादन करावें लागतें, व तितक्याच अनेक गुणांनीं त्याचें संरक्षण करावें लागतें. त्यांत बालाग्र उणें पडतां नये; आणि कोणाकडून कधीं कांहींही उणें न पडलें तर एकदां ज्या समाजानें पुढें सरसावण्यास आरंभ केला त्यास शेवटपर्यंत वाटेंत अडथळा येण्याचें कारण नाहीं. बंदोबस्त नीट असल्यावर अडचणी कोणीकडूनही येणार नाहींत, आणि एकदां जमलेली घडी कदापि बिघडावयाची नाहीं. सूर्य, चंद्र, कायम आहेत तोंवर अशा कर्तव्यदक्ष आचार्यांनीं चालविलेल्या कर्तव्यशील समाजाच्या प्रगतींत कधींही अंतर पडणार नाहीं.

असो, झाली गोष्ट ती झाली. स्थिति जरी पालटली तरी पूर्वार्जित वायां जावयाचें नाहीं. आतां तरी मागल्या अनुभवाचा पूर्ण उपयोग

करून घेऊंया. जग आहे कसें, लोक आहेत कोठें, कमी काय आहे व अधिक काय केलें पाहिजे, स्वत्वाचें आणि स्वातंत्र्याचें रक्षण करून कोणत्या मार्गानें लोकांना बरोबर घेऊन कसें गेलें पाहिजे, कोणते विशेष गुण त्यांचे अंगीं उत्पन्न झाले पाहिजेत, इत्यादि गोष्टींचा आतां विचार करूंया. एकट्यानेंच पुढें जाऊन राष्ट्राचा फायदा नाहीं. सर्वांना घेऊन पुढाऱ्यानें पुढें गेलें पाहिजे. मोक्षाचें प्रकरणीं देखील स्वार्थ उपयोगी पडत नाहीं. त्यांत देखील सर्वांस वांटेकरी केलें पाहिजे. हा अनुभव आतां आह्मांला कोणी सांगावयास नको. आरोग्यरक्षणाकरितां सर्व अवयवास व्यायाम देणें जसें जरूर आहे, त्याप्रमाणेंच सर्वांची सारखी योग्यता वाढवीत, प्रसंग पाहून सर्वांचे साहाय्य घेत, आपणांस पुढें गेलें पाहिजे, या दृष्टीनें या गोष्टींचा विचार करितां भारतीयांच्या एकीकरणासाठीं, त्यांच्या सुखासाठीं, त्यांच्या शारीरिक मानसिक, आणि औद्योगिक उन्नतीसाठीं जे निर्बंध पूर्वीं धर्मकालीं घालून दिले होते, ते सध्याच्या पालटलेल्या स्थितीच्या, बदललेल्या अनुभवाच्या व घसरलेल्या योग्यतेच्या मानानें सर्वांशीं उपयुक्त असूं शकणार नाहींत. केवल नीतीचीं तत्वें अप्रतिम, हितकर, व पुरुषार्थदायक, खरीं; परंतु विशेष अधिकार व विशेष परिस्थिति यांचें आनुकूल्य असल्यावांचून त्या नीतितत्वांचा अंगीकार झाल्यास त्यापासून अर्थापेक्षां अनर्थ अधिक होतो. लोकांच्या समजुतीस रुचतील व कालाच्या धोरणास जीं अनुसरून असतील व जीं हित साधितील, तींच त्या लोकांचीं व त्या काळाचीं नीतितत्वें होत; तीच त्या काळीं त्यांना समजतील व तींच त्या काळीं त्यांचे हित करितील. आज काय पाहिजे, व तें कसें मिळविलें पाहिजे याचा आधीं विचार झाला पाहिजे. राष्ट्रांच्या झगड्यांत सुख, सत्ता, व स्वतंत्रता बळकावून बसण्याला व अब्रूनें स्वतःचें रक्षण करण्याला, जें कांहीं पाहिजे असेल तें आज ज्या उपायांनीं मिळेल ती आजची नीति. उद्यां परिस्थिति पालटल्यास व हेतु बदलल्यास उद्यांचे नीति-नियमही बदलतील. कालच्या उपायांनीं आजचें कार्य साधावयाचें नाहीं व आजचे उपाय उद्यांचे

उपयोगीं पडावयाचे नाहींत. नीति, सुखाचें स्वस्थतेचें, व पुरुषार्थाचें, साधन आहे. माणसाकरितां नीति; नीतिकरितां माणूस नव्हे, हें तत्व ध्यानांत ठेविलें पाहिजे. उपदेश, नीति आणि वर्तन कालानुसार आणि योग्यतेनुसार असणें जरूर आहे व तसें असेल तरच तें हितकर होईल. या दृष्टीनें विचार करितां मागले नियम आज सर्वांशीं लोकांचें हित करितील असें दिसत नाहीं, आणि समंजस माणसाकडून त्यांचा अनादर होऊं लागला आहे, यावरूनही हेंच सिद्ध होतें. ह्मणून आजच्या परिस्थितीचा विचार करून, समाजाच्या गरजा, त्याचा स्वभाव व त्याची योग्यता पूर्णपणें जाणून, त्याच्या कल्याणासाठीं, त्याच्या वर्तन-नियामक निर्बंधांत कोणते फेरफार केले पाहिजेत, कोणत्या नवीन गोष्टी करावयास व कोणत्या जुन्या वर्जावयास सांगितल्या पाहिजेत, याविषयीं आज आपणास विचार करावयाचा आहे. ही सापेक्ष नीतीचीं तत्वें सद्य:स्थितीस अनुसरून परंतु उत्तम स्थितीस नेऊन पोहोंचविणारीं असल्यामुळें, खरीं परमार्थसाधक होत. समाजाला सुखी, सज्ञान, सशक्त, आणि संयुक्त, करणारी तींच तत्वें होत. आचार्यांना ती सापेक्ष असोत, परंतु समाजाला तीं केवळ नीतीच्या तत्वासरखींच आहेत. राष्ट्राचें, समाजाचें आणि व्यक्तीचें आजपर्यंत जें हित झालें आहे, तें सापेक्ष नीतीच्या तत्वांनींच साधून दिलेलें आहे, असें जगाच्या इतिहासावरून व चालू व्यवहारावरून कोणासही कळून येईल. भारतीय प्रजेच्या हितासाठीं आज आपणास जे निर्बंध घालून द्यावयाचे आहेत. ते अर्थात् वरील तत्वांस अनुसरूनच तयार करावयाचे आहेत. ते तयार करितांना आजच्या स्थितीचें आणि इष्ट स्थितीचें धोरण राखिलें पाहिजे आणि उपायांची योजना झाली पाहिजे. त्याचप्रमाणें लोकस्थितींत पुढें जे फेरबदल होत जातील, त्यांजकडेही फार सूक्ष्म लक्ष दिलें पाहिजे व प्रसंगास अनुसरून व्यक्तीच्या आणि समाजाच्या वर्तनक्रमांत वरील फेरफारामुळें जे फरक करणें अवश्यक दिसेल, ते तत्काल करीत गेलें पाहिजे. जुन्या कायद्यांस परिस्थितीच्या आणि अनुभवाच्या मानानें नेहमीं चालन दिलें पाहिजे, ह्मणजे ते लोकोपयोगी व सजीव राहतील आणि लोकांच्याही आदरास ते नियम व तत्प्रवर्तक आचार्य निरंतर पात्र होतील.

परंतु आचार्य जनहो! आपण सूज्ञच आहा. मी ह्मणजे सुचवावयाला पाहिजे असें नाहीं. या कामीं आपलें सर्वस्वी साहाय्य पाहिजे आहे. आपणांस अतिशय तत्पर आणि दक्ष राहिलें पाहिजे. त्यावांचून हें कार्य साधावयाचें नाहीं व कार्यसिद्धि वांचून कर्तव्य-ऋणांतून आपण मोकळें होत नाहीं. लोक स्वतःच्या प्रपंचांत, स्वसुखाच्या चर्चेंत, चूर असणार; त्यांचें क्षितिज नेहमीं संकुचित राहणार; समाजाच्या अथवा राष्ट्राच्या व्यापक दृष्टीनें त्यांस विचार करितां यावयाचा नाहीं; सारी परिस्थिति त्यांस पाहतां यावयाची नाहीं; प्रसंगानुरोधानें त्यांस कर्तव्याचें निदान ठरवितां येणार नाहीं; आणि तें कामही त्यांचें नव्हें. तें काम नायकाचें आहे व त्यानेंच तें केलें पाहिजे. त्याशिवाय त्यानें दुसरें कोणतेंही काम करूं नये व करण्यास सवडही नाहीं. आपल्या समाजाची उन्नति हाच त्याचा विषय, समाजाचें जें सुख तेंच त्याचें सुख, समाजाचा ज्यांत उत्कर्ष तेंच त्याचें कर्तव्य, समाजाचें ज्यांत जीवन तोच त्याचा प्राण; असा समाजाशीं आचार्यांचा एक जीव झाला पाहिजे. त्यांना त्यांचें स्वतःचें ह्मणून कांहीं एक निराळें काम असतां उपयोगीं नाहीं. त्यांना स्वतःचा संसार नको, स्वतःचें सुख नको, स्वतःचा निराळा लाभ नको, समाजाचा जो लाभ तोच त्यांचा लाभ व समाजाची जी हानि तीच त्यांची हानि. समाजाचे इष्ट हेतु सफल करून देणें, त्यास सुज्ञ, सदृढ आणि सुखी करणें, व त्यांच्या प्रगतीचा क्रम अव्याहत चालूं ठेवणें हेंच आचार्यांचें कर्तव्य होय. एका जन्मांत करून तें संपणार नाहीं; पुनः पुनः जन्म घेऊन आपल्या लोकसेवेच्या कार्यीं त्यांनीं तत्पर असलें पाहिजे. जीवभावासह समाजाच्या शरीरांत प्रवेश करून त्यांनीं राहिलें पाहिजे. स्वतः मरून त्यांनीं लोकांस जिवंत केलें पाहिजे. लोक जिवंत आहेत तोंपर्यंतच आचार्य सजीव आहेत; एरव्हीं नाहींत. सूर्य स्वतः तेजस्वी आहे, त्यास आपलें दर्शन लोकांना घडावें ह्मणून उदय पावावयाचें नाहीं; तर इतर सर्व वस्तूंना तापवून सचेतन करण्यासाठीं त्यास उदयास्ताचा खटाटोप करणें आहे. आचार्य हो! आपल्या रक्तानें स्नान घालून

लोकांस शुचिर्भूत करा, आपल्या जीवाचा विनिमय करून त्यांस सचेतन करा, आपल्या तृष्णेचा उच्छेद करून लोकांचें वैभव वाढवा, आपल्या वासना जाळून लोकांचे मनोरथ पुरवा, आपला लौकिक पालथा घालून लोकांस लौकिकास चढवा, आपणाला नाहींसें करून प्रजेला उत्पन्न करा; आपली वाफ करून घेऊन उदार सागरासारखी लोकांवर जीवनाची वृष्टी करा आणि स्वतःच्या सर्वस्वाचा यज्ञ करून देवांना प्रसन्न करा आणि त्यांजकडून लोकांस वरप्रदान करवा. आचार्य बुद्धिस्थानीं आहेत आणि जनता शरीरस्थानीं आहे. दोहोंचा संयोग सदोदित राहिला पाहिजे आणि उभयतांच्या साहाय्यानें एकमेकांनीं पुरुषार्थ साधिला पाहिजे. तुह्मांस दुसरें काम नाहीं. प्रजेचें काम साधून देणें हेंच तुमचें स्वतःचें काम. स्वतंत्रपणें ज्ञान, योग, आणि बल वाढवून घेण्याचें सामर्थ्य तुह्मांत आहे आणि लोकांत तें सामर्थ्य आणि ते गुण उत्पन्न करण्याकरितांच आपले ठिकाणीं तुह्मीं तें उत्पन्न केले पाहिजेत. कलीचा विषारी वारा लागूं नये ह्मणून आपण हिमाचलीं जाऊन बसलों आणि समाधि—साधनांत तत्पर राहिलों तर दुष्टबुद्धि-प्रवर्तक कलींत आपल्या प्रजेची दशा काय होईल? द्वापारयुगाच्या सात्विक शिक्षणानें तयार केलेल्या भारतीयांचा इतर कलि-पुत्रापुढें कसा निभाव लागेल? शिव होऊन शिवाचें वजन करावें लागतें; तद्वत् कलीचा कावा ओळखून अथवा प्रसंग विशेषीं कलिरूप होऊन प्रजेकरितां प्रजेचें कलीपासून संरक्षण केलें पाहिजे. दुष्ट युगाची छाया पडल्यामुळें त्याच्या पापरूप संस्कारापासून लोकांना अधिक काळजीनें आणि प्रयत्नानें वांचविलें पाहिजे. लोक अजाण आहेत ह्मणून त्यांना आचार्यांनीं सांभाळून नेलें पाहिजे व त्यांच्या अजाणतेपणांत पापात्म्या कलीची भर पडल्यानंतर तर त्यांना सांभाळण्याविषयीं विशेषच जपले पाहिजे. आज हिंदुस्थानांत तुमच्या वतीनें जे तुमचे प्रतिनिधि ह्मणून समाजांत वापरत आहेत त्यांची स्थिति इतकी भ्रष्ट झाली आहे कीं, त्यांच्या स्वार्थपरतेमुळें, दुराग्रहामुळें आणि अज्ञानामुळें साऱ्या हिंदु समाजाचा, आपण चांगला प्रतिकार न केल्यास, लौकरच नाश होईल अशी भीति वाटते. त्या दांभिकांना, त्या वेदविक्रयी, लोभाविष्ट ब्राह्मण वेश्यांना; त्या पोटार्थी, लौकिकार्थी, स्वाभि-

मानशून्य, गर्विष्ठ, कठोर, तोतया, लोकाग्रणींना; अधिकारावरून दूर केलें पाहिजे आणि आपलें काम आपणाला जातीनें हातीं घेतलें पाहिजे. पूर्वी समाज यंत्र सुरळीत सुरू करून घटकाभर हें काम हातावेगळें केलें होतें; परंतु तेवढ्या आवकाशांत केवढा अनर्थ झाला पहा! आतां येथून हलावयाचें नाहीं. जन्मोजन्म लोक-हितीं दक्षराहून लोकसेवाच स्वतंत्रपणें करावयाची, स्वत:करितां मुक्ति देखील आपणास नको; कारण मुक्त झाल्यानंतर लोक शिक्षणाचें कर्तव्य बजावितां येणार नाहीं. प्रसिद्ध समुद्रमंथनांत जशीं अत्युत्तम चवदा रत्नें निर्माण झालीं त्याप्रमाणें अतिप्रचंड राष्ट्रीय उत्क्रमणांत जे महासिद्धांत उदय पावतात त्यांपैकींच हा एक होय. त्याचें अनुसंधान आपण सोडतां कामा नये. विश्वंभर प्रभूची आज्ञा या रूपानेंच प्राप्त होत असते आणि तिला सर्वथा सादर असणें सर्वांच्या आधीं आपलें कर्तव्य आहे.

ज्या सच्चिदानंद प्रभूच्या अतर्क्य योजनेला अनुसरून ही अगाध विश्वघटना बनून आली, स्थिरावली आणि उत्कर्ष पावली, जो सर्व पदार्थांत पदार्थरूप होऊन आणि शक्तींत शक्तिरूप होऊन राहिला, ज्याचें भूतवात्सल्य पदोपदीं प्रगट होत आहे. ज्याचें बुद्धिमत्व सर्व वस्तूंच्या चर्येवर विलसत आहे, त्या प्रभूला अनन्य भावानें शरण होऊन त्याचें ध्यान करावें अशी माझी सर्वांस प्रार्थना आहे. ध्यानानें योजनेंत प्रवेश होईल, ध्यानानें गुणांत मिसळतां येईल, ध्यानानें ध्येयासारखें होतां येईल, ध्यानानें प्रगतीचा ओघ कळेल, ध्यानानें प्रभूची आज्ञा उमजेल आणि ध्यानानेंच आत्म्याचा विस्तार आणि शक्तीचा संचार होईल. नंतर स्वत:च्या दृष्टीनें केवळ निरपेक्ष परंतु प्रजाहितरूपीं फलाच्या दृष्टीनें केवळ सापेक्ष अशा आपल्या उद्योगापासून कालत्रयीं पराङ्मुख न होण्याविषयीं त्रिवार शपथ घेऊन आपल्या प्रस्तुतकार्यास आरंभ करूं. विश्वाच्या आद्यंताविषयींचें निदान अगोचर आहे; तथापि मधल्या स्थितीच्या धोरणाचें बरेंच चांगल्या रीतीनें अनुमान करितां येतें; त्यांस आणि सध्याच्या वस्तुस्थितीस अनुसरून समाजाच्या उन्नतीसाठीं निर्बंध घालून द्यावयाचें आज आपण योजिलें आहे. त्या कामास आरंभ करावा.

याप्रमाणें भाषण झाल्यानंतर पुढील ठराव सर्वानुमतें कायम करण्यांत आले.

ठराव १—आत्म्याला जसें शरीर तसें शरीराला राज्य आहे. आत्म्याच्या सुखासाठीं आणि उन्नतीसाठीं शरीराचें योग्य संगोपन करणें ज्याप्रमाणें अवश्यक आहे त्याचप्रमाणें शरीराच्या संरक्षणासाठीं राज्य रक्षण करणेंही अवश्यक आहे. तेव्हां ज्याला आत्मोन्नत्ति साधावयाची आहे त्यानें शरीर आणि राज्य यांविषयीं उदासीन न राहतां, आत्म्याचे हिताकरितां, आपल्यापेक्षांही अधिक त्यांची काळजी घेतली पाहिजे. शरीराची व राज्याची जो उपेक्षा करील तो परमप्रिय आत्म्याची उपेक्षा करणारा आत्मघातकी समजला पाहिजे.

ठराव २—व्यक्तीचा संसार प्रपंच आणि व्यक्तिसमुदायाचें अथवा समाजाचा संसार राज्य हे दोन्ही संसार प्रत्येक व्यक्तीनें मोठ्या आस्थेनें, सुखाचा व लौकिकाचा पूर्ण अभिलाष धरून, वाखाणण्याजोग्या रीतीनें केले पाहिजेत. राजसिंहासनावर कोणीही आरूढ होवो त्यांच्या जातीकडे अथवा वयाकडे न पाहतां त्यांचा आदर करावा. परंतु राजा विष्णू नव्हे, राज्य राजाचें नव्हे; तें लोकांचें आहे. प्रपंच मायेचा नव्हे; तो माणसाचा आहे. प्रपंच-पद्धति आणि राज्य-पद्धति माणसांच्या हिताकरितां आहेत व त्यावर सर्व प्रकारची सत्ता प्रत्येक माणसाची आहे. प्रत्येकानें दोहोंची काळजी घेतली पाहिजे. स्वत:च्या स्वातंत्र्याकरितां आणि सुखाकरितां दोहोंचाही त्यानें अभिमान बाळगिला पाहिजे. राज्याशीं आणि संसाराशीं व्यक्तीचा एक जीव झाला पाहिजे. उत्तम रीतीनें हा लहान मोठा संसार ज्याला करितां येणार नाहीं तो परमार्थ साधनाला कधींही योग्य होणार नाहीं. संसार परमेश्वरापासून माणसाला विभक्त करितो, हा समज खोटा आहे. उलट ईश्वरनिर्मित संसाराच्या मुशींत शिरल्यापासून माणसांच्या अंगीं ईश्वराचे गुण उद्भवूं लागतात आणि योग्य रीतीनें संसारसेवनाच्या द्वारानेंच ईश्वराची खरी उपासना घडते. त्याचप्रमाणें संसार स्वभावत: दु:खमय आहे हाही समज चुकीचा आहे. माणसाच्या चुकीमुळें, दुर्बलतेमुळें

आणि अज्ञानामुळें संसारांत दुःखाचा जरी बराच अंश आढळून येतो तथापि कालावधीनें आणि विचारानें आणि प्रयत्नानें तो समूळ नाहींसा करून सोडितां येणार आहे यांत संशय नाहीं. रोगरहित सुदृढ शरीर, सर्वार्थ-साधक नीति, आणि सर्व-भेदक बुद्धि हीं तीन संसारसुखाचीं मुख्य साधनें होत. तीं प्रयत्नानें प्राप्त करून घेतलीं असतां संसारांतील सर्व दुःखाचें निर्मूलन होईल; इतकेंच नव्हें, तर सर्व सुखाचें साधन होईल. या तिन्ही वस्तु दुष्प्राप्य नव्हत. परिस्थितीशीं झगडून तुह्मीं त्या हस्तगत करून घ्या. खरें मोठेंपण मिळण्याकरितां प्रपंचांत माणसाला मोठालीं कामें करावयाचीं आहेत आणि तीं करितां करितां तो मोठ्या कामाएवढा मोठा होत जातो. संसार दुःखमय आहे ह्मणून त्याला भिऊन मागें सरूं नका आणि शुद्धींत दुःखानुभव येतो ह्मणून बेशुद्धीच्या डोहांत प्राणांत करून घेऊं नका. आजच्या स्थितींतही संसार बराच सुखावह आहे. तसें नसतें तर आत्मघात करून बहुतांनीं त्यांतून स्वतःस सोडवून घेतलें असतें. आज माणूस दुर्बल आहे आणि अपूर्ण आहे ह्मणून संसार त्यास अंशतः दुःखदायक भासतो आहे; तो दुबळेपणा घालविण्याकरितां संसारसेवना व्यतिरिक्त अन्य उपाय नाहीं. संसाराच्या स्थितीवरून माणसाच्या योग्यतेचें अनुमान होतें. संसार दुःख देतो त्या अर्थीं पूर्ण सुखाचा अनुभव घेण्यास माणूस अद्यापि तयार झाला नाहीं हें उघड आहे. तेव्हां स्वतःची योग्यता वाढवून आणि संसारास पूर्णपणें काबूंत आणून त्यावर विजय मिळविणें हाच पुरुषाचा खरा पुरुषार्थ होय. तुह्मी सामर्थ्यहीन आहां ह्मणून सामर्थ्याचे योगानें प्राप्त होणारी आणि त्याच्या अभावीं हातीं न येणारी वस्तु नादान किंवा अपायकारक आहे असें ठरत नाहीं व वेडेपणानें तुह्मी तसें ठरवूं नका. तुह्मी नादान असल्यामुळें संसार सुखमय नाहीं. तुह्मी समर्थ व्हा आणि मग पहा संसारांतील दुःखाची कीड कशी निघून जाते आणि तो कसा मंगलमय आणि इष्ट होतो तो. प्रपंचांत जो करंटा तो परमार्थांत कोठलें भाग्य काढील? प्रपंचाचें आणि परमार्थाचें वाकडें नसून प्रपंच हाच परमार्थाचा पूर्वार्ध होय. या विरुद्ध तुह्मांस कोणी कांहीं सांगूं लागल्यास त्याचें ऐकूं नये व त्या घर-

बुडव्या चकव्याचे नादीं लागून रोकड्या स्वार्थास लाथाळूं नये. उत्तम परमार्थ तोच कीं जेणेंकरून संसार उत्तम प्रकारें करितां येईल. तेव्हां अनेकविध सुखांचा यथेच्छ लाभ घेत, आपलें अनेक प्रकारचें कर्तव्य यथासांग बजावीत. स्वातंत्र्य आणि समृद्धि-यांची भरपूर जोड करीत, आणि युक्ति, ज्ञान, आणि बल काबीज करीत, प्रत्येकानें उत्तमप्रकारें संसार करावा.

ठराव ३.—समाधानांत सुख मानून स्वत:स कोणीही फसवून घेऊं नये. खरें सुख हव्यासांत आहे; खरें सुख प्राप्तींत आहे; खरें सुख कर्तव्यांत आहे. ज्ञानाविषयीं, लौकिकाविषयीं, सुखाविषयीं, संपत्तीविषयीं, स्वातंत्र्याविषयीं, परोपकाराविषयीं, पराकाष्ठेचा हव्यास असूं द्या. वैराग्य, संन्यास, वासनाक्षय, कर्मफलत्यागाचा योग, परलोक, निर्वाण, इत्यादि गोष्टी ज्यांच्या आटोक्या बाहेर असतील त्यांस त्या तूर्त खोट्याच आहेत व ह्मणून त्यांच्या योग्यतेस आणि परिस्थितीस अनुरूप नसल्यामुळें त्या त्यांचें हित करणार नाहींत. तुह्मी त्या सांप्रत विसरा व आपल्या कोशांतही त्यांस हरताळ लावा. अगोदर इहलोकींचें मनोरथ सफल करा. अगोदर येथें सुखी आणि संपन्न व्हा. सृष्टि आणि व्यवहार, शास्त्र आणि प्रयत्न, यांच्या तालमींत कसून शरीराचें, मनाचें आणि बुद्धीचें सारें तेज खुलून बाहेर पडूं द्या. पराक्रमानें इहलोक अगोदर सर करून घ्या. सुखशांति आणि सत्य हीं ज्याकालीं येथें प्राप्त होतात त्याकालीं परलोकही येथेंच येतो. समाधान हा आळशांचा वेदांत आहे. खऱ्या सांसारिकाचा धर्म उद्योग होय. दुबळेपणामुळें खऱ्या संसारांत ज्याची निराशा होते तो खोट्या समाधानांत मनाला बुडवून घेऊन दोहींकडून आंचवतो. तुमच्या अंत:करणांतील सर्व मनोरथ पुरवून घ्या, जें पाहिजे असेल तें अनुकूल करून घ्या, आणि आजच्या गरजा सरल्यानंतर उद्यांच्या उद्योगासाठीं, उद्यां आणखी नवीन उत्पन्न करा. सामान्य जनाला वैराग्यासारखें भाग्यहानिकर दुसरें कांहीं नाहीं आणि प्रपंचासारखें दुसरें भाग्य नाहीं. अभावरूप विरक्तींत सुख मिळेल ह्मणून आसक्तीच्या राजपथापासून जो बापडा फिरेल तो खऱ्या लाभास

कायमचा मुकेल. संसाराच्या सुखसागरांत जो कोरडा राहिला तो वैराग्याच्या मृगजलांत काय ओला होईल? वैराग्य अथवा सर्वसंगपरित्याग हा आत्महत्येचा एक निराळा प्रकार आहे. तो कोणी पत्करूं नये. गुरुत्वाकर्षणामुळें जसें वस्तूस वजन मिळालें आहे तसेंच साऱ्या संसारसुखाचा उगम वासनेपासून आहे. ती वाढवा, ती पूर्ण करा आणि सुखी व्हा. प्राण्याला सुख जर स्वभावतःच हवें आहे तर हरप्रयत्नानें तें त्यानें मिळवावें हेंच त्याचें कर्तव्य; त्याचप्रमाणें जगावें अशी जर त्याची स्वाभाविक प्रवृत्ति आहे तर त्यानें भरपूर जगावें हेंच उचित. त्यानें डोकींत राख घालून सुखाचा विध्वंस करावा किंवा विरक्तीच्या मार्गानें जिवंतपणींच मरण्याची तयारी करावी हें जितकें अनुचित तितकेंच अस्वाभाविक आहे. वैराग्य हें शारीरिक आणि मानसिक क्षयाचें लक्षण आहे आणि उत्साहयुक्त उद्योग हें सजीवपणाचें लक्षण आहे, हें ध्यानांत असूं द्या. आपला कार्यभाग साधला ह्मणजे निराळे होऊं नका. ज्या दुबळ्यांचा साधला नसेल त्यांस सबल करून त्यांसही सुखी करा. आजपर्यंत उद्योगानेंच सर्वांचें कल्याण केलें आहे; फुकाच्या पोकळ समाधानानें कोणीही कृतार्थ झाला नाहीं. उद्योग, कर्तव्य, सुख, स्वातंत्र्य आणि ज्ञान यांचे पायीं मरण येणें हें समाधानानें काष्ठासारखें जगण्यापेक्षां अधिक श्रेयस्कर होय.

ठराव ४.—ज्या थोड्यांना तपाचरण करावयाचें असेल त्यांना एकीकडे बसूं देऊन फलाहार अथवा उपवास करूं द्यावा. बाकी सर्वांनीं उत्साहानें प्रपंच करण्यासांठीं आणि पराक्रमानें राज्य करण्यासाठीं अवश्यक ठरल्यास खुशाल वाटेल तो आहार करावा. त्वेष, आवेश, उल्हास, सतत कायम राखण्यासाठीं आवश्यक अशा खाद्यादि चतुर्विध आहाराचें सेवन करावें. दिनचर्येंत आहार आणि व्यायाम हीं मुख्य कामें समजावींत. शरीराच्या साहाय्यानें जर तुह्मांला पुष्कळ मोठालीं कामें करावयाचीं आहेत, तर शरीर जितकें धिप्पाड, दांडगें व राकट करितां येईल तितकें करणें जरूर आहे. इतकेंच नव्हे, तर सदृढ संततीच्या रूपानें तें जितकें वाढवितां येईल तितकें वाढविलें पाहिजे. कितीही

श्रमाला आणि त्रासाला न जुमानण्या इतकी रग अंगांत राहिली पाहिजे. शरीर दृढ व दीर्घ करण्याकरितां व राखण्याकरितां आणि आयुमर्यादा वाढविण्याकरितां खाद्यपेयांत जे फेरबदल करणें इष्ट दिसेल ते खुशाल करावेत आणि वैद्य शास्त्राच्या दृष्टीनें जें हितकर ठरेल तें बेलाशक घ्यावें. अन्न परब्रह्म आहे, अशी श्रुति आहे; तेव्हां प्रत्येकानें भोजनाचें काम देवतार्चना इतकें आस्थेनें केलें पाहिजे. शरीराच्या उत्कर्षा बरोबर जीवाचा उत्कर्ष होतो आणि जीवाप्रमाणें पुरुषार्थ साधितां येतो. तेव्हां अनेक प्रयत्नानें जीव चांगला राखिला पाहिजे, आणि त्याला चांगलें राहण्याकरितां शरीराचें भक्कम घर बांधून दिलें पाहिजे. आत्म्याच्या हिताच्या भ्रांतीनें उपवासांनीं आणि खडतर तपानें जो आपलें सोन्यासारखें शरीर जाळून घेतो तो वेडा आत्म्याला तर अगोदरच मुकलेला असतो, परंतु हातीं असलेलें आत्मप्राप्तीचें साधन जें शरीर तेंही हरवून बसतो. देह नाशवंत आहे ह्मणून त्याच्या नाशाची वेळा येण्यापूर्वीच जो त्याची उपेक्षा करून त्याचा नाश करितो तो प्रभूची अवज्ञा करितो आणि स्वहिताला कायमचा मुकतो.

ठराव ९.—प्रत्येक व्यक्तीनें उत्तम शरीर बाळगून शिपायीगिरीच्या कामांत प्राविण्य संपादन केलें पाहिजे. ज्ञानाची आणि सुखाची प्रत्येकास इच्छा असली पाहिजे, तशींच शौर्याचीही आवड असली पाहिजे. स्वदेशाच्या रक्षणाकरितां प्रत्येक स्त्री, पुरुष, बाल, तरूण आणि वृद्ध, या तीनही अवस्थेंत आपल्या मातृभूमीचा बंदा शिपायी आहेच. स्थितिपरत्वें सर्व कामें सर्वांचीं सारखीं आहेत. शांततेच्यावेळीं तुह्मी योगी व्हावें, सभेंत तुह्मी पंडित असावें आणि संकटसमयीं, समरप्रसंगीं तुह्मींच शूर शिपायीही बनावें. पोटार्थी शिपायी काय काम करील? युद्धकलेचा प्रत्येकानें अभ्यास केला पाहिजे, साहसाचीं कामें करून प्रत्येकानें धाडसी झालें पाहिजे व द्रोणाचार्यास गुरू करून मिळविलेली धनुर्विद्या आमरण सज्ज राखिली पाहिजे. निर्वाहाचीं साधनें हवीं त्यानें हवीं तीं उचलावीं; आवडीचे विषय रुचतील ते निवडावें; परंतु सारें राष्ट्र नखशिखांत क्षत्रिय झालें पाहिजे. यांतच तुमचें व तुमच्या राज्यकर्त्यांचें खरें हित आहे.

ठराव ६. आर्यभूमीचा व आर्यपूर्वजांचा आमरण अभिमान बाळगा. जीवानें तुह्माला सोडीपर्यंत या अभिमानानें तुह्माला टाकूं नये. तिची सेवा करण्याचें आणि त्यांचा सत्कृतीनें उद्धार करण्याचें तुमचें तीव्र व्रत असूंद्या. देशाभिमानाला सोडून आपला घात करून घेऊं नका. हिंदुत्वाच्या अभिमानावांचून प्रत्येक हिंदू अमंगल आणि कलाहीन होय. स्वाभिमानाची ऊब ज्याच्या रक्तात नाहीं तो प्रेतवत् होय. जो सर्वांचा मित्र होतो त्याचे हातून विशेष हित कोणाचेंच होत नाहीं आणि जो कोणाचाच मित्र नसतो तो निखालस भुईला भारच होतो. तेव्हां ज्याला स्वहित पाहिजे असेल त्यानें आपल्या समाजाच्या आणि आपल्या मातृभूमीच्या हिताविषयीं दृढ अभिमान धरिला पाहिजे. देशाच्या पोटांत व्यक्तीचा समावेश होतो; तेव्हां देशाची दुर्दशा झाल्यावर त्यांतील व्यक्तीचे हाल कुत्रा देखील खाणार नाहीं. आपलें उत्कृष्ट कुलाचार, आपल्या उत्तम संस्था, आपले कुलगुरु आणि आपला देदीप्यमान इतिहास यांचा पूर्ण अभिमान बाळगा. त्यांत कांहीं दोष असले तरी त्यांचा अव्हेर न करितां त्यांत सुधारणा करा. सत्व कायम राखून सुधरा. प्रत्येक हिंदूनें सतत हिंदु राहून इमानानें आपलें कर्तव्य बजावावें अशी आर्यभूमातेची इच्छा आहे.

ठराव ७. भगवद्गीतेंत वाखाणिलेली दैवी संपत्ति, सत्वगुण, मोक्षमार्ग, ब्रह्मचर्चा, यांविषयीं बुद्धिवाद सांगावयाला आह्मीं तुह्माजवळ आहों. तें काम करावयाला अमेरिकेंतील, रशियांतील अथवा विलायतेंतील बाया माणसांच्या भूतदयेची तुह्मांस गरज नाहीं. तेंच मुळीं आमचे शिष्य आहेत; ते आह्मापेक्षां तुह्मांस अधिक तें काय सांगतील. त्यांचा वरील विषयासंबंधानें तुह्मांस हल्लीं जो बोध चालला आहे, तो तूर्त तुह्मीं बिलकुल ऐकूं नये असें त्यांच्या गुरूचें तुह्मांस सांगणें आहे. तुमच्या सुधारणेंत आणि योग्यतेंत जी पीछेहट झाली आहे तीमुळें शुद्ध सत्वगुणाच्या उपदेशाला तुह्मीं आज अधिकारी उरला नाहीं. शिवाय सांप्रतचा काल आणि जगाची स्थिति ही कलिप्रभावामुळें अशी झाली आहे कीं, त्यांत केवळ सत्वगुणाच्या आश्रयानें राहणें स्वातंत्र्यास

आणि प्राणधारणास विघातक होत आहे. एका दुर्दैवाच्याकालीं केवळ सात्विक वृत्तीनींच तुमचा घात केला, हें चांगलें स्मरणांत असूं द्या. व त्या अपघाताचे जे भयंकर परिणाम आज तुह्मांस भोगावे लागत आहेत, त्यांतून उत्तीर्ण होण्याकरितां राष्ट्रीय संबंधानें तुह्मीं सत्वमिश्रित रजोगुणाचाच आश्रय केला पाहिजे. सत्वांशही जो पाहिजे तो वस्तुस्थितीशीं आणि इष्ट हेतूशीं अनुरूप असला पाहिजे. झालें तितकें पुरें. दुर्बल झाला, विपन्न झाला, दीन झाला, पराधीन झाला, शरीराचा आणि जीवाचा, जीवाचा आणि सुखाचा, वियोग होत आला. आतां तो राजयोग कोणाच्या प्रेताकरितां करणार? आतां तुह्मांला हठयोगच पाहिजे. व तोच तुह्मी स्वीकारावा आणि आपला कार्यभाग साधून घ्यावा. स्वार्थ साधनाची पंचाईत पडूं लागली असतांना त्याशीं विरोध करणाऱ्या अधिक परमार्थाचा उपदेश तुह्मांस नको आहे व तो तुमच्या उपयोगीही पडावयाचा नाहीं. असले जे उपदेशक तुह्मांकडे येतील त्यांच्या नादीं न लागतां त्यांस ताबडतोब स्वदेशीं जावयास सांगा. कारण तुह्मांला देण्यापुरता परमार्थ अद्यापि त्यांसच मिळाला नाहीं व शिवाय त्यांच्या करुणेची, त्यांच्या धर्माची व त्यांच्या वक्तृत्वाची त्यांच्या जात-भाईसच तुह्मांपेक्षां अधिक जरूरी आहे. तेव्हां तिकडेसच आपल्या प्रयत्नांचा मोर्चा फिरविण्याविषयीं तुह्मींच उलट त्यांस उपदेश करा. हर प्रयत्नानें धर्म आणि प्रेम कायम राखून आधीं पुरता स्वार्थ साधा, मग परमार्थ तुमचाच आहे.

ठराव ८. भारतीयांनो! तुह्मी फार चांगले, फार सत्वशील, फार दयाळू, तुह्मापासून इतरांस कधीं अपाय पोहोंचला नाहीं व यापुढेंही पोहोंचणार नाहीं असा भरंवसा आहे. परंतु दुसऱ्याला पीडा देण्याकरितां जे दुर्गुण लागतात त्यांपैकीं कांहीं परपीडेपासून स्वतःचें रक्षण करण्यासही लागतात. परपीडेची भीति आहे तोंवर आत्मसंरक्षणासाठीं ते सर्व आपल्या अंगीं उत्पन्न करा व सांभाळून ठेवा. अपहारबुद्धि, क्रौर्य, अज्ञान, उन्मत्तपणा, स्पर्धा, द्वेष, मत्सर, इत्यादि दुर्वृत्तींचा एक लेश ज्याचे अंगीं आहे असा जगाच्या कोनाकोंपऱ्यांत जोंपर्यंत एक जिवंत

माणूस शिल्लक आहे तों पर्यंत आत्मसंरक्षणार्थ लागणाऱ्या सर्व गुणांचीं अथवा दुर्गुणांचीं तुह्मी नीट जतन करून ठेवा. किंबहुना जगांतील सारीं रानटी हिंस्र श्वापदेंही माणसाळून मेंढरांसारखी गरीब होईपर्यंत तुह्मी कांहीं असुरी वृत्ति शिल्लक असूंच द्या. तोंपर्यंत तुमच्या अंगीं कामापुरतें पशुत्व कायम राहूं द्या! कोल्ह्याचें कपट, माकडाची दगाबाजी, कावळ्याची धूर्तता, सर्पाची सावधगिरी, डुकराचा बेफामपणा, वाघाचें क्रौर्य व सिंहाचें धैर्य हीं एकत्र मिळवा व माणसाच्या अकलेच्या तंत्रानें त्यांचा समय पाहून उपयोग करा. ह्मणजे सर्व कालीं सर्व अरिष्टांपासून तुह्मी निर्भय रहाल. त्यांना नांवें मात्र सर्वांना रुचतील अशींच द्या; कारण शुष्क नांवासाठीं उगाच वाद नको. हेतु मात्र बळकट असूं द्या ह्मणजे झालें. युरोपांतील नीतिमान राजकार्यकुशल महात्म्यांचे, प्रभूचें नांव घेऊन, शिष्यत्व करा ह्मणजे तुमच्या हिताचा मार्ग तुह्मास दिसेल. याप्रमाणें आततायी, हितशत्रु, आणि दुष्ट यांच्या अपकारापासून स्वत्वाचें रक्षण करण्यासाठीं पाहिजे असलेले गुण संपादन करीत असतांना आप्त, स्वजन आणि इष्ट यांचे आणि स्वतःचें जीवित सुखावह व्हावें एतदर्थ प्रेम, दया, शांति, सत्यप्रीति, परोपकार, इत्यादि अनेक सद्गुणांचाही तुह्मामध्यें उत्कर्ष होत असावा. नंतर वाघ, मेंढरूं एका ओहोळावर पाणी पिऊं लागलीं, खासगी मालमत्तेचें बंड मोडलें, सर्वांना सर्व पाहिजे तितकें मिळूं लागलें, संसार–सुखाचा वीट आला, विषय-सेवनांतील गोडी लयास गेली, अंतःकरणांतील आनंदमयकोश उघडले व मोक्ष चिंतनांत तुह्माखेरीज जगांतील सर्व लोक खरे खरे गुंग झाले. ह्मणजे तुह्मीही आपल्या रजोगुणाची होळी करा आणि पुढल्या पाडव्यास साम्राज्याची, शांतीची व परमार्थाची गुढी उभारून अंतीं सर्वांसह सावकाश सायुज्यपदाची वाट धरा.

ठराव ९. भरतवर्षाला आपला मायदेश जे मानितील, पिढ्यान्‌पिढ्या येथेंच राहण्याचें जे ठरवितील, व भरत खंडाच्या रक्षणासाठीं आपलें रक्त मांस खर्ची घालण्यास जे तयार असतील, ते सर्व हिंदू असें समजावें. जाति अनेक असोत, मतें भिन्न असोत, पंथ विविध असोत, वेष विचित्र असोत, व बोली आणि चाली पृथक असोत, हिंदुस्थानचे कायमचे व कळकळीचे

रहिवाशी या नात्यानें तुह्मी सर्व भाऊ भाऊ आहांत. हिंदुस्थानच्या जमीनीवर सर्वांचे उपजीवन होत असल्यामुळें तुह्मी सर्व एकाच आईचें दूध पीत आहां. तेव्हां तुह्मी आपसांतला द्वेषभाव मोडून टाका, परस्पराविषयीं बंधुप्रेम जागृत असूं द्या आणि सुखाच्या व दुखःच्या वेळीं हातांत हात घालून व खांद्याला खांदा लाऊन समायिक हिताकरितां एक दिलानें तयार असा. आपसांत तुमचे हजार प्रकारचे वाद जरी चालू राहिले तरी त्यांपासून एकमेकांच्या मनांत वैरभाव उत्पन्न होण्याचें कारण नाहीं. हक्कांसाठीं वाद होतील व ते झाले पाहिजेत; परंतु त्यांपासून व्यक्तीविषयीं वैमनस्य उत्पन्न न व्हावें व प्रसंगीं एकानें दुसऱ्याचें साहाय्यार्थ व सर्वांनीं मिळून समाजाचे व देशाचे साहाय्यार्थ उडी घालण्यास तत्पर रहावें. खासगी द्वेषाच्यापायीं अथवा एकट्याच्या करंट्या स्वार्थाच्या नादीं, जातीशीं, समाजाशीं आणि देशाशीं दगा करून त्याजवर संकट आणणें अत्यंत मूर्खपणाचें, घरबुडवेपणाचें, कृतघ्नपणाचें, आणि आत्मघाताचें काम आहे. लहान, थोर, दुर्बल, सबल, मतिमान्, मतिमंद, सुरूप, कुरूप, सधन, निर्धन, सद्‌गुणी, दुर्गुणी, हे स्वाभाविक भेद माणसांमध्यें राहणारच; परंतु यांखेरीज कृत्रिम जातिभेद बिलकुल नकोत. देश, धर्म आणि धंदा, या मानानें जे शेंकडों निष्कारण भेद उत्पन्न झाले अथवा केले आहेत, आणि त्यांबरोबर आपला सर्व व्यवहार जो संकुचित करून घेतला आहे, तो तुह्माला अपायकारक होत आहे. हे सारे तुह्मी घातलेले बांध फोडून टाका आणि साऱ्या हिंदुस्थानच्या, निदान हिंदु, रहिवाशांची एक जात होऊं द्या. अशा प्रतिबंधांनीं निष्कारण एकमेकाला वाळीत टाकून तुह्मी आपलें बळ मात्र कमी करून घेतलें आहे; तें दूर सारा आणि आपल्या व्यवहाराचा पैस वाढवा. अधिकारपरत्वें कर्तव्य आणि कर्तव्य परत्वें जाति सृष्टिनियमाला अनुसरून चालतीलच. आपले मित्र, आपले सोयरे, जो तो आपल्या आवडीप्रमाणें निवडील आणि आवड समानतत्वावर अवलंबून राहील. हा प्रकार कृत्रिम जातिभेद राखला असतां जसा होईल तसाच तो मोडला असतांही होईल. तथापि आपसांतील फुटाफूट मोडण्याकरितां, संयोगास साहाय्य करण्याकरितां, व निवडीचें क्षेत्र वाढविण्याकरितां जातिभेद मोडून टाक-

ण्याचा पुष्कळ उपयोग होईल. मतवैचित्र्य आणि क्रियावैचित्र्य कायम राहील; पण त्या वैचित्र्यांबद्दल, तें कोणाच्या स्वाधीनचें नसल्यामुळें व प्रत्येकाला योग्य स्वातंत्र्य असणें जरूर असल्यामुळें, कोणी कोणावर न रुसावयास लोक लौकरच शिकतील.

ठराव १०. मनुष्याच्या बुद्धीच्या, सामर्थ्याच्या, गुणाच्या व आवडीच्या रूपानें परमेश्वर प्रत्येक घरांत न्यूनाधिक प्रमाणानें वसत आहे. तेव्हां विचाराअंतीं स्वत:ला जें योग्य वाटेल तदनुसार प्रत्येकानें वर्तन ठेविलें ह्मणजे त्यानें जवळच्या व खऱ्या देवाची सेवा केली आणि आपल्या जबाबदारींतून तो मोकळा झाला. ज्यास जितकें सामर्थ्य दिलें असेल तेवढ्याचा, ज्यास जितकी बुद्धि दिली असेल, तिच्या मानानें, प्रत्येकानें पूर्ण उपयोग करावा ह्मणजे तो पूर्णायुषी आणि कृतकार्य झाला असें समजावें. डोळ्याला आसवें आणून, देवाची प्रशंसा करून, देव प्रसन्न व्हावयाचा नाहीं. असल्या पोकळ आर्जवानें आणि स्तुतिपाठानें प्रसन्न होण्याइतका तो भोळा असेल असें मानणें माणसाचें वेडेपण होय. देव प्रसन्न व्हावा असें जर तुह्मांस वाटत असेल, तर तुह्मीं स्वत:ला प्रसन्न करून घ्या आणि तुह्मांला स्वत:ला जर प्रसन्न करून घेणें असेल, तर तुमच्या समजुतीप्रमाणें, गुरुंच्या उपदेशांत, शोधकांच्या ग्रंथांत अथवा तुमच्या अनुभवांत योग्य असें जें तुह्मांला आढळून येईल त्याचा संतोषानें अंगीकार करा व अंगीकृत कल्पनेप्रमाणें कोणास अपाय न होईल अशा रीतीनें निर्भयपणें वागणूक ठेऊन आपल्या सामर्थ्याचा सद्व्यय करा. समजत नाहीं त्यावर भोळेपणानें विश्वास ठेऊं नका; ज्याचा प्रत्यय येत नाहीं ते वेडेपणानें समजलें असें समजूं नका; व ज्यावर विश्वास नाहीं त्याप्रमाणें दांभिकपणानें आचरण करून जगाला फसवून स्वत:ची फसवणूक करून घेऊं नका. तुह्माला मिळालेल्या शारीरिक आणि मानसिक देणग्या उपयोग करण्यासाठीं दिलेल्या आहेत, त्यांना वायां दवडूं नका. अथवा दाबून जागच्याजागीं जिरऊन टाकूं नका. त्या देणग्यांचा तुह्मी यथाशक्ति पूर्ण उपयोग केला ह्मणजे तुह्मीं आपल्या कर्तव्य ऋणांतून मोकळे झाला. देणगीच्या लक्षणावरून

तुह्मीं काय केलें पाहिजे हें ओळखावें आणि सामर्थ्यावरून तें किती केलें पाहिजे हें जाणावें.

ठराव ११. कर्मेंद्रियांनीं करण्यासारखें जेवढें असेल तेवढें सर्व केल्यानंतर आणि ज्ञानेंद्रियांनीं जाणण्यासारखें जेवढें असेल तेवढें जाणिल्यानंतर अतींद्रिय ब्रह्मतत्वाविषयीं विचार करण्याचा अधिकार येतो. मी ब्रह्म आहे असें नुसतें चिंतन केल्यानें जर ब्रह्म कळालें व मिळालें असतें, तर आज भरतभूमि ओसाड सांपडली असती आणि स्वर्गांत रहावयाला जागा मिळाली नसती. तेव्हां अगोदर हितकर अशीं सर्व कर्में करा, सर्व प्रकारचा शोध करा, सर्व सृष्टि चाळून शास्त्रांचा उत्कर्ष करा. सर्व शास्त्रांची, सर्व उद्योगांची आणि सर्व शक्तींची चहूंकडून सारखी वाढ होत असावी. एका अंगाच्या नादीं लागून दुसरीकडे दुर्लक्ष होऊं नये. सर्व, ह्मणजे जाणण्यासारखें आणि करण्यासारखें वास्तविक जितकें आहे, तितकें, तुमच्या समजुतीच्या अथवा सामर्थ्याच्या आज आटोक्यांत येतें तेवढें सर्व नव्हे. आपल्या लहानशा कल्पनेनें विस्तीर्ण ज्ञेयाला लहान करूं नये, आपल्या थोडक्या सामर्थ्यानें अमर्याद सत्तेला संपुष्टांत आणूं नये, आणि आपला मोठे होण्याचा मार्ग कुंठित करून घेऊं नये. पदार्थसृष्टीचा आणि मानसिक-सृष्टीचा अंत लावून तिला अंकित करा व सुखाची, सामर्थ्याची आणि ज्ञानाची सर्व साधनें अनुकूल करून घेऊन सर्व योग्य वासना पुरवून घ्या; ह्मणजे क्रमाक्रमानें आपोआप तुमचें सामर्थ्य आणि योग्यता वाढतील आणि ब्रह्मज्ञान व मोक्षमार्ग तुह्मांला सहज उमजूं लागतील. कर्मानें पराक्रम वाढतो आणि पराक्रमाच्या मानानें यथास्थित कर्म घडूं लागतें. अवलोकन, संशोधन, मनन, आचरण, इत्यादि कर्मांनीं अंतःकरणाचें सामर्थ्य वाढतें आणि अंतःकरणाच्या वाढत्या सामर्थ्याच्या मानानें वरील क्रिया चांगल्या व अधिक होऊं लागतात. व्यवहारांत प्रापंचिक, सामाजिक आणि राजकीय उद्देशानें उपासना, ज्ञान, कला, सुख, शिक्षण आणि सामर्थ्य, यांच्या प्राप्तीकरितां समंजसपणानें हेतुपूर्वक ज्या क्रिया होत आहेत त्या सर्वांचा कर्म-योगांत समावेश होतो. त्या कर्मांचे, पदार्थ आणि मन यांवर

संस्कार घडतात आणि इष्टापत्तीही त्यांपासूनच होते. या क्रिया हेंच कर्म, हेंच सजीव कर्मकांड, व हेंच फलप्रद होईल. ज्याचा अर्थ समजत नाहीं, ज्याची उपयुक्तता दिसत नाहीं, जें कांहीं देत नाहीं व कांहीं नेतही नाहीं, तें जड, अचेतन, कर्म, नव्हें.

ठराव १२. ऐहिक संपत्तीचा संग्रह करा. सोनें, नाणें, रत्नें, यांचें भांडार भरा. अनेक प्रकारच्या उद्योगांनीं आणि साहसांनीं सुखाची आणि ऐश्वर्याची सर्व साधनें उपभोगासाठीं हस्तगत करा. त्रैलोक्यांत उपयुक्त आणि मौल्यवान जेवढें सांपडेल तेवढें आणून घर भरा. कलाकौशल्य शिका, कारखानें उभारा आणि तुमच्या गरजा भागविण्याला लागणारे सर्व पदार्थ सत्तेचे तयार करा. स्वत: ऐदी राहून वडिलांनीं राखून ठेविलेली संपत्ति परदेशीं पाठवूं नका आणि पोरां बाळांस अविचारानें भिकारी करून सोडूं नका. तुमच्या देशाच्या जमिनींत कांहीं पिकत नाहीं असें नाहीं. तसेंच तुमच्या सामर्थ्यानें आणि कुशलतेनें तयार होणार नाहीं असेंही कांहीं नाहीं. महारोग्याच्या हातच्या वस्तूंप्रमाणें सर्व विदेशीय वस्तूं मानून त्यांचा तिरस्कार करा व त्यांस शिवूं नका. तेणें करून तुमचा उद्योग वाढेल, बोज राहील व लक्ष्मी अंकित वसेल.

ठराव १३. आपल्या स्त्रियांना बरोबरीचा मान द्या. त्यांस मित्र समजा. व्यवहारांत त्यांस मोकळे पणानें वापरूं द्या, व स्वत:चें कर्तव्य बजावून गुणानुरूप योग्य स्थान त्यांस मिळवूं द्या. त्या तुमच्या दासी नव्हत. केवळ तुमच्या सुखाची त्या साधनें नव्हत. दोषांचे आगर आणि नरकपुरीचें द्वार ह्मणून जी त्यांची निर्भर्त्सना तुह्मां पैकीं कोणाकडून होत आहे, त्या पातकामुळेंच सांप्रत तुह्मांस दैन्यरूप नरकवास भोगावा लागत आहे. आणि खरोखर कृत कर्माबद्दल लौकर प्राय:चित्त न घेतल्यास तुमची दुर्दशा होईल. उभयतांचे हक्क समान आहेत. उभयतांची योग्योता सारखी आहे. उभ-उभयतांची उपयुक्तताही समान आहे. तेव्हां उभयतांनीं प्रेमानें, एक विचारानें आणि बरोबरीनें वागावें हेंच उचित आहे व हेंच उभयतांच्या

हिताचें आहे. स्त्रियांस अज्ञानांत ठेविल्यानें व सर्व प्रसंगांत त्यांस समागमें न घेतल्यानें तुमचा नाश होईल. स्त्री ही संसाराचें तुह्मां इतकेंच प्रधान अंग होय. तेव्हां तुह्मांला जर सुरेख संसार चालवावयाचा आहे तर दोन्हीही अंगें सारखीं समंजस व आपापल्या कर्तव्यांत सारखीं निष्णात पाहिजेत. प्रत्येकास मिळवितां येईल तितकें ज्ञान मिळणें जरूर आहे. त्यात प्रतिबंध करण्याचा अथवा मर्यादा घालण्याचा कोणास अधिकार नाहीं. ह्मणून स्त्रियांस तुमच्या बरोबरीनें सज्ञान होऊं द्या. फारा दिसांच्या एके प्रकारच्या वहिवाटीमुळें आज ज्या स्थितींत त्या दिसतात ती त्यांची स्थिति स्वाभाविक नसून कृत्रिम आहे; ती कायमची नसून निराळ्या प्रकारच्या शिक्षणानें बदलणारी आहे. तें योग्य शिक्षण त्यांस द्या आणि स्त्रीचें स्त्रीत्व कायम राखून त्यांची स्थिति व त्यांचा स्वभाव सुधारा. तुमच्या स्त्रिया सुशील आहेत, त्यांच्या अंगी कांहीं गुण अमोल आहेत. ते नीट संभाळून ठेवा. विवाह पद्धतींत फेरफार करा. अत्यंत मित्र भावानें व प्रेमभावानें स्त्रीपुरुषांनीं आपणाला अभेद्य विवाहबंधनांत गांठून घ्यावें, उभयतांच्या स्वभावांत सुंदर मिलाफ असावा, दोघांचा एक जीव व्हावा आणि एकमेकांच्या गुणांनीं परस्परांच्या सुखास भरतें यावें आणि संसारिक कर्तव्याचा उत्कर्ष व्हावा. लग्नें, स्वयंवर पद्धतीनें प्रौढवयांत होऊं द्यावी. तोंपर्यंत स्त्रीपुरुषांनीं संतोषानें ब्रह्मचर्यव्रताचें पालन करावें आणि नंतर आपण चालविलेल्या प्रापंचिक, सामाजिक, राजकीय व शास्त्रीय कामीं आपणाला साहाय्य करण्याकरितां व आपण ती जेथें सोडिली तेथून तीं पुढें तशींच किंबहुना अधिक नेटानें चालविण्याकरितां संतति निर्माण करावी. सदृढ, सुज्ञ आणि दीर्घायु पुत्र उत्पन्न होणें हेंच पितरांच्या सद्वर्तनाचें द्योतक आहे. संतान, हेंच पितरांचे स्मारक होय. शास्त्राचें, प्रगतीचें, राज्याचें आणि कर्माचें प्रत्येक व्यक्तीवर मोठें ऋण आहे; तें फेडण्याकरितां संतानरूपानें प्रत्येकानें पुनः पुनः जन्म घेणें भाग आहे.

ठराव १४. वयातींत मुलांपेक्षां अल्पवयस्क मुलांची अधिक काळजी घ्या. त्यांच्या शिक्षणाकरितां होईल तितका प्रयत्न अगोदर करा. विलायतेंतील तीन 'र' कारांचें शिक्षण ह्मणजे तीन सुरांनीं रडणें होय.

पहिल्यानें बालकांचा स्वभाव हातीं घ्या. व त्याबरोबरच त्यांचें शरीर व त्यांची बुद्धि वळवा आणि वाढीस लावा. लिहितां वाचतां सहज येईल व सहजांतच तें शिकवा. पहिल्यापासून नीट अवलोकन करावयास त्यांस शिकवा, त्यांची कल्पकता वाढवा आणि स्वतंत्र व व्यवस्थित रीतीनें त्यांस विचार करावयास शिकवा. कर्तव्याचें महत्त्व पहिल्यापासून त्यांचे लक्षांत आणून द्या आणि सतत उद्योगाची संवय लावा. व्यवहारांत गुरु, मित्र, पिता, पुत्र, पति, पालक, बंधु, विद्यार्थी, शेजारी, नागरिक, इत्यादि अनेक नात्यानें त्यांना जीं अनेक कर्तव्यें करावयाचीं आहेत, तीं यथास्थित बजावण्यास व स्वतःचें व स्वकीयांचें रक्षण करण्यास जे गुण व जी तयारी पाहिजे आहे ती सर्व करून द्या. खरें शिक्षण तें. नुसतें लिहिणें, वाचणें घेऊन, स्वतंत्र विचाराला आणि व्यवसायाला फारकत देऊन, केवळ ताबेदारीला योग्य करणारें गुलामांचें शिक्षण फुकट मिळालें तरी घेऊं नका. मुलांमुलींना खरें शिक्षण भरपूर द्या, व उभयतांचे स्वभाव सुधरून त्यांस पराक्रम व शहाणपण प्राप्त होईल, मोठ्या आनंदानें कर्तव्यदक्ष राहून संसारयात्रा करितां येईल व शेवटीं आपली सर्व कमाई आपल्या वारसांस देऊन शांतपणानें व संतोषानें परलोकाची वाट धरितां येईल, असें करा. ज्या शिक्षणानें मनोवृत्ति संस्कृत होतील, हिताहित कळेल, प्रसंग ओळखितां येईल, बुद्धीचें सामर्थ्य वाढून स्वतंत्र विचार करितां येईल, सुखाचें वर्म आणि ऐश्वर्याची वाट सांपडेल, आपल्या अनेकविध कर्तव्यांचा उमज पडेल व तें निर्भयपणें बजाविण्याचें धैर्य आणि सामर्थ्य येईल, तेंच खरें शिक्षण होय. बाकी दुसऱ्यांच्या पोथ्यांतून उसनवार आणिलेली माहिती फारशी उपयोगीं पडणार नाहीं. उसनें आणण्याची संवय लागल्यास उत्पन्न मात्र करितां यावयाचें नाहीं. ज्या शिक्षणानें राखतां येईल, ज्या शिक्षणानें उत्पन्न करितां येईल व ज्या शिक्षणानें पुढें सरसावतां येईल त्याचेंच नांव शिक्षण. मागल्या पिढीचा सारा अनुभव पुढील पिढीस मिळाला पाहिजे; नाहीं तर राष्ट्राच्या शक्तीचा अपव्यय झाल्यासारखें होईल. पुढील पिढीस पुष्कळ गोष्टींत नव्यानें आरंभ करावयास नको व मागल्या पिढींत झालेलें स्वानुभवानें पुनः मिळावावयास नको.

इतकें शिक्षण मुलांना देऊन त्यांना वाटेस लावण्याचें काम मागल्या पिढीनें न केल्यास तिनें आपलें कर्तव्य बजाविलें नाहीं असें होईल. आपली प्रौढ आणि अनुभविक अंत:करणें आपल्या काबूबाहेर गेलेल्या जीर्ण शरीरांतून काढून व पुत्राच्या आणि पुत्रीच्या नूतन शरीरांत प्रवेश करून वडिलांनीं जगावयाला पुन: नव्यानें आरंभ केला पाहिजे.

ठराव १९. शिक्षणाचा सगळा भर बुद्धिवर्धनाकडेच असूं नये. बुद्धि पंगु आहे; बुद्धि शरीर आहे, बुद्धि यंत्र आहे. तिला पाय, तिच्यांत जीव आणि तींत वाफ असल्यावांचून तिच्यानें कार्यें उठावयाचीं नाहींत. ती मार्ग शोधणारी आणि दाखविणारी आहे. मार्ग चालून जाणारी मनोवृत्ति आहे. तेव्हां उत्तम, निवडक, मनोवृत्तींचा पूर्ण विकास केला पाहिजे. स्वाराच्या तंत्रानें, पण स्वाराला बरोबर घेऊन, घोडा जसा भरधांव निघतो त्याप्रमाणें विवेकाच्या तंत्रानें पण विवेकाला पाठीवर घेऊन, मनोवृत्ति धावूं लागल्या पाहिजेत. प्रेम, दया, शौर्य, अभिमान, ईर्ष्या, हौस, सत्यप्रीति, स्वातंत्र्यप्रीति, औदार्य, इत्यादि मनोवृत्तींचा भरपूर विकास होऊन मानससरोवरांत त्या उचंबळूं लागल्या पाहिजेत. मोठा उल्हास, मोठा आवेश, मोठा वेग, मोठी ईर्ष्या, यांनीं अंत:करण तुडुंब भरलें पाहिजे. म्हणजे पहा काय काय चमत्कार होऊं लागतात ते! तुह्मी अगदीं निर्जीव, निरुत्साह, नि:सत्व, निस्तेज, निर्माल्य, बनून गेलां आहां. जगण्याची हौस नाहीं, स्वातंत्र्याची चाड नाहीं, संसाराची आस्था नाहीं, शास्त्राची अभिरुचि नाहीं, पराक्रमाची ईर्ष्या नाहीं, साहसाची गोडी नाहीं, कलेची आवड नाहीं, स्वत:विषयीं आणि स्वदेशाविषयीं अभिमान नाहीं. शरीरांत जसें रक्त आणि उष्णता तद्वत अंतकरणांत वृत्ति होय. वृत्तीमुळेंच विवेकाचा जोम आहे, वृत्तीमुळेंच विवेकाचा पराक्रम आहे, वृत्तीमुळेंच विवेकाची कृतार्थताही आहे. बुद्धीच्या साहाय्यानें सत्याचें ज्ञान होणें ही महत्वाची गोष्ट खरी; परंतु त्या सत्य ज्ञानाला उत्कंठेनें अनुसरून चालण्याची इच्छा आणि शक्ति किंबहुना त्यांहूनही महत्वाची गोष्ट होय. औषधीच्या परिज्ञानापासून जसें रोगनिवारण होत नाहीं, तसेंच नुसत्या शाब्दिक सिद्धांत-ज्ञानानें सदाचरण

साध्य होत नाहीं. रोगनिवारणासाठीं जसें औषध, तसेंच सदाचारासाठीं ज्ञान. ज्ञान हें साधन आहे आणि आचरण ही सिद्धि आहे आणि ही सिद्धि प्राप्त होण्याला सद्वृत्तीच्या साहाय्याची विशेष जरूर आहे. शक्तीच्या अभावामुळें नुसतें ज्ञान कृतींत न आणितां, आल्यास दु:खाला आणि पश्चात्तापाला मात्र कारण होईल. तुमचा विवेक तुह्माला जें बोधितो तें आचरणानें घडवून आणण्यापुरतें वृत्तिबल फार थोड्यांचे अंगीं दिसून येतें. तुह्माला वेगवान्, जोरदार, मनोवृत्ति पाहिजेत. कैवल्यप्राप्ति केवळ ज्ञानापासून कधींही झाली नाहीं व होणार नाहीं; तिला ज्ञानानुसारी कर्मच पाहिजे आणि कर्माकरितां वृत्तीचें शुद्ध बल पाहिजे. त्याच्या साहाय्यानें अद्यापि तुह्मांस पुष्कळ कार्यभाग उरकून घ्यावयाचा आहे. याकरितां नानाप्रकारच्या उत्सवांनीं, प्रसंगांनीं, अनुभवांनीं कृतींनीं आणि विशेष प्रकारच्या शिक्षणानें, वृत्ती पुष्ट झाल्या पाहिजेत व जीव, उल्हास, आणि हौस, हीं वाढलीं पाहिजेत. कामापुरती बुद्धि तुह्मापाशीं आहे; पण शक्तीवांचून शिवाचा प्रभाव दिसणार नाहीं. ज्ञान मिळेल तितकें पाहिजेच व त्या बरोबरच तुमच्या शरीरांत न मावेल इतकें चैतन्य–स्फुरणही झालें पाहिजे आणि बुद्धीच्या व चैतन्याच्या संयोगापासून तत्काल उपयोगीं पडतील अशा कृती निष्पन्न होऊं लागल्या पाहिजेत. ज्ञान आणि शब्द व शब्द आणि कृति यांमधील फट मिटली पाहिजे आणि त्या सर्वांचा सुंदर मेळ बसला पाहिजे; तुह्मी पहिल्या प्रतीचे व्यावहारिक बनलें पाहिजे, जग जसें असेल तसें घेऊन चाललें पाहिजे, व उद्यांचें साधण्याच्या आशेनें कल्पनेच्या चकव्याच्या नादीं लागून आजचें हातून निसटूं देतां कामा नये. तुमचें मन उसळावें तितकें उसळत नाहीं आणि शरीर मनामागें नीट धांवत नाहीं. केवळ पुस्तकांच्या नादीं लागून पुस्तकासारखे जड होऊं नका; पुस्तकें जेथून जशीं उत्पन्न झालीं तेथून तसेंच, पुस्तकालाही बरोबर घेऊन, आपलें ज्ञान खणून आणा आणि जें आणाल तें आणिलें आहे असें शब्दांत आणि क्रियेंत दिसूं द्या.

ठराव १६. नीति आणि अनीति हा भेद सापेक्ष आहे. स्थिति परत्वें त्यांत पालट पडतो व पाडणें जरूर आहे. अन्यकालीं अहिंसा नीति असेल, परंतु युद्धकालीं हिंसा हीच नीति होय. सुख, सत्ता, सत्य आणि सुस्वभाव या इष्ट वस्तु होत; त्या ज्या प्रकारच्या आचरणानें प्राप्त होतील आणि सतत हातीं राहतील ती नीति आणि बाकीची सारी अनीति. नीतिनियम साधनरूप होत. ते माणसाच्या हिताकरितां आहेत; माणूस नियमाकरितां उत्पन्न झाला नाहीं किंवा नियमासाठीं तो जगतही नाहीं. ते नियम त्याच्या हिताकरितां उत्पन्न होत आहेत. तेव्हां सत्ता, सुख आणि शहाणपण, प्राप्त होण्याला ज्या कालीं ज्या प्रकारचें वर्तन ठेवणें भाग असेल त्या प्रकारचें त्या कालीं, कोणास अपाय न होईल, स्वजनाशीं प्रेम राहील, आणि स्वभाव भ्रष्ट न होईल, अशा रीतीनें, वर्तन करून इष्ट वस्तु नेहमीं साध्य करून घेत जावी. प्राप्यापेक्षां प्रापक नियमांचें महत्व वाढविणें ह्मणजे चाकराचे चाकरीस धन्याला ठेवण्यासारखें किंवा जीव देऊन शरीर घेण्यासारखें वेडेपणाचें होय. व्यक्तीचें आणि समाजाचें स्वातंत्र्य कायम राखून त्यांची व्यावहारिक आणि पारमार्थिक उन्नति जेणें करून होईल ती नीति आणि इतर कार्यघातकी अनीति. अविचारी भोळ्या माणसांनीं मुख्य गोष्टीकडे दुर्लक्ष करून नियमांचें महत्व वाढविलें आणि शेवटीं फसले. भलेपणानें वागणें सुखावह आणि श्रेयस्कर आहे ह्मणून, अथवा दुसऱ्यानें भलेपणानें तुह्मांशीं वागावें ह्मणून तुह्मींही त्याशीं भलेपणानें वागावें हें खरें; पण दुसऱ्यानें भलेपणानें वागावें असें तुह्मांला वाटलें ह्मणून अथवा तुह्मीं त्यांच्याशीं भलेपणानें वागला ह्मणून तो तुह्मांशीं भलेपणानेंच वागेल असा नियम नाहीं, अशा वेळीं तुमच्या भलेपणाचा दुरुपयोग होऊन प्रसंगीं त्यापासून तुमचें नुकसानही होईल, ह्मणून सावध असा. तुह्मीं भल्याशीं फार भलें असावें, दुर्जनांचें भक्कम शास्त असावे आणि जे मूढ असतील त्यांशीं सावध असावें. अयोग्य उपायांनीं लाभ व्हावा अशी तुमची इच्छा कधींही नसावी; त्याप्रमाणेंच इतरांचेही तसले उपाय न चालू देण्याविषयीं आणि गाफलपणानें स्वतःचें नुकसान न होऊं देण्याविषयीं खबरदारी ठेवावी. तांबड्या इंडियनांनीं

कोलंबसाचा देवदूताप्रमाणें सत्कार केला व कोलंबसानें त्यांचा निर्वंश करून उपकार फेडला! तेव्हां जी पासून स्वत:चें नुकसान होईल ती अनीति; सर्व प्रकारचा स्वत:चा व स्वदेशाचा अर्थ जी पासून साधेल ती नीति; हें तत्व गाफलपणानें पुन: कधींही विसरूं नका. प्रसंग, काल, अनुभव आणि परिस्थिति, यांस अनुसरून तिनें फिरावें, संबंधास अनुसरून तिनें वागावें आणि मनाला भ्रष्ट होऊं न देतां तिनें नेहमीं अनिष्ट टाळून इष्ट संपदावें. मित्रत्वाचे आणि आप्तपणाचे नीति नियम निखालस आणि स्वतंत्र आहेत ह्मणून त्यांजविषयीं निर्बंधाची गरज नाहीं.

ठराव १७. मताचें आणि क्रियेचें स्वातंत्र्य प्रत्येकास आहे, व दुसऱ्याला इजा न होईल अशा रीतीनें त्याचा प्रत्येकानें स्वहितावर दृष्टि देऊन उपयोग करावा. एकाच्या अनुकूल मताबद्दल दुसऱ्यास संतोष वाटल्यास चालेल, परंतु एकाच्या विरुद्ध मताबद्दल दुसऱ्यानें व्यर्थ त्रास मानून घेऊं नये. मतांत भेद आला ह्मणून वैरास अथवा तिरस्कारास जागा झाली, असें मुळींच होत नाहीं. त्यामुळें लोभांत अंतर पडण्याचेंही कारण नाहीं. हें स्वातंत्र्य तुह्मीही ध्या, व दुसऱ्यांनाही तसेंच घेऊं द्या. जगा आणि जगूं द्या. मतें अनेक उत्पन्न होतील व त्यांबद्दल प्रत्येकास सारखा अभिमान वाटेल. स्वमत ज्याला त्याला आपल्यापुरतें खरें आहे; यांत संशय नाहीं. तें तो दुसऱ्याला चिडविण्यासाठीं अथवा स्वत:चें अहित करून घेण्यासाठीं उत्पन्न करीत नाहीं. तेव्हां स्वमताविषयीं विशेष आग्रह धरून दुसऱ्याचा अपमान अथवा छल करावयास कोणीही प्रवृत्त होऊं नये. स्वमताची युक्तता आणि परमताची अयुक्तता युक्तीनें सिद्ध करीत असावें व तसें करीत असतांना विरुद्ध मतवाद्यांविषयीं आदरबुद्धि वसावी. मतवैचित्र्य इष्ट आहे. तें बुद्धीच्या सजीवपणाचें चिन्ह आहे व प्रगतीचें चालक तत्व आहे. जगाचा फायदा स्वतंत्र विचारानें करून दिला आहे व डोळे मिटून, रुढीला चिकटून राहिल्यापासून जातीची दुर्दशा झाली आहे. फेरफार उन्नतीचें बीज आहे, आणि उत्क्रांतीचें चैतन्य आहे; तें गेलें ह्मणजे तुह्मी राहून शोभा नाहीं. प्रभूच्या सृष्टींत वैचित्र्य भरपूर आहे, आणि मनुष्यस्वभाव त्या सृष्टीचाच भाग असल्यामुळें त्यांत विचित्रपणा उत्पन्न होणें

प्रभूला अमान्य नाहीं, हें उघड आहे. मोठ्या समुद्राच्या पृष्ठभागावर निरनिराळ्या आकारांच्या लक्षावधि लाटा उत्पन्न होतात त्या जशा जलतत्वाशीं विसदृश असत नाहींत, त्याचप्रमाणें नाम, रूप, आचार आणि विचार, यांत उत्पन्न झालेले प्रकार अनेकत्वामुळें बुद्धितत्वाला सोडून नाहींत. मताच्या आणि कृतीच्या वैचित्र्याला जगांत जागा पुष्कळ आहे. विकार, विचार आणि आचार, वृत्तींचे, बुद्धीचे आणि शक्तीचे, विलास होत. अनेक प्रकारांनीं अंतःकरण प्रगट होत आहे, त्याची गति कुंठित करूं नये.

ठराव १८. सर्व कामाला नेहमीं स्वतःपासून आरंभ करा. स्वतःशीं इमानानें वागा. आपल्या समजुतीपासून ज्ञानाला आरंभ करावा; आपल्या शक्तीपासून पराक्रमाला आरंभ करावा; आपल्या आवडीपासून सुखाला आरंभ करावा; आपली स्थिति पाहून परोपकाराला आरंभ करावा; आपलें मत पाहून वागणुकीला आरंभ करावा. बृहस्पतीनें केलेला बोध तुमच्या समजुतीच्या पलीकडे असेल तर तो बाजूस ठेवा; परशुरामाचा पराक्रम तुमच्या सामर्थ्याबाहेर असेल तर त्याची इच्छा करूं नका; तुमची गरीबी असेल तर दुसऱ्यावर उपकार करून स्वतःला भिकेस लावून घेऊं नका; तुमच्या मनोवृत्तीचें ज्यांत रंजन होत नसेल त्यांत जुलमानें सुख मानून घेऊं नका; स्वार्थ प्रिय वाटतो तोंवर पोकळ परमार्थाच्या भरीं भरूं नका. स्वतः आहात त्यापेक्षां अधिक होऊं नका व कमीही राहूं नका. तुमच्या सर्व उद्योगांत तुमचे पण कायम असूं द्या. तुह्मीं, तुह्मीं राहून जगावें. जें समजतें तेवढेंच समजतें, असें समजावें व स्वतःच्या समजुतीच्याअंतीं कशालाही न जुमानतां निर्भयपणें कृति करीत जावी. खासगी व्यवहारांत दंभ नको, ढोंग नको, कृत्रिम नको. जसे असाल तसे दिसा व सतत पुढें सरण्याचा व सुधारण्याचा यत्न असूं द्या. रूढीला भिवूं नका आणि बहुमताला मनाविरुद्ध मानूं नका. तुमच्या विचारास जें योग्य दिसेल तें खुशाल बोला आणि चाला; मग त्यापायीं जें होईल तें होवो. या प्रामाणिकपणामुळें मरण आलें तरी पत्करा;

परंतु मनाला न जुमानून आपल्या हातानें आपली हत्या करून घेऊं नका. आपल्या समजुतीपेक्षां अधिक शहाणे होऊं नये, आपल्या शक्तीपेक्षां अधिक पराक्रमाचा डौल घालूं नये व आपल्या आवडीला ओलांडून सुख शोधूं नये. अनुकरण करणें तें स्वतःच्या समजुतीप्रमाणें ज्यांवर विश्वास बसत असेल, ज्याची भाषा तुह्मांस कळत असेल व ज्याचे विचार तुह्मांस उमजत असतील आणि हितकर वाटत असतील, त्यांचेंच करावें; दुसरा, शहाणपणाविषयीं बृहस्पतीचा दाखला घेऊन जरी तुह्मांपुढें येईल तरी, त्याचें सांगणें तुह्मांस रुचत नसल्यास व तुमच्या समजुतीच्या आटोक्याबाहेर असल्यास, तुह्मीं त्याचा जरूर निषेध करावा. जेवढें तुह्मांस साध्य असेल तेवढें करा. ह्मणजे स्वतःच्या व समाजाच्या ऋणांतून मोकळे व्हाल. दिलेल्या गुणापेक्षां अधिक गुण व दिलेल्या सामर्थ्यापेक्षां अधिक सामर्थ्य तुह्मीं दाखविलें नाहीं ह्मणून परमेश्वर तुह्मांवर रागावणार नाहीं; परंतु दिलेल्या गुणाचा आणि सामर्थ्याचा नीट आणि पूर्ण उपयोग तुह्मीं केला नाहीं तर मात्र, तुह्मीं आपलें जिणें फुकट दवडिल्याबद्दल, तुमचा धनी तुह्मांवर रुसेल. दुसऱ्यानें चांगलें ह्मटल्यानें अंगचें वाईटपण जात नाहीं आणि वाईट ह्मटल्यानें चांगुलपण सुटत नाहीं. तेव्हां मनाला फसवून लोकांच्या डोळ्यांत धूळ घालूं नका आणि फुकाचें बरें ह्मणवून घेऊन बरे झाला असें समजूं नका. मुख्य स्वतःच्या मनाची भीड धरा, त्याला आपला वैरी करून घेऊं नका.

ठराव १९. स्वतःच्या सरल उद्योगानें जेवढें मिळेल त्याचाच उपभोग घ्या. भिक्षा मागून दुसऱ्याच्या आश्रयावर जगूं नका; तसेंच वडिलोपार्जित दौलतीवर आयती मजा मारूं नका. प्रत्येकानें शक्तिप्रमाणें पराक्रम केलाच पाहिजे व त्या पासून जेवढें मिळेल तेवढ्यावर चरितार्थ चालविला पाहिजे. ह्मणजे तुह्मांत आळस राहणार नाहीं व मिंधेपण शिरणार नाहीं; देशाची संपत्ति वाढेल आणि तुह्मीं सुखी व स्वतंत्र व्हाल. जे तुमच्या कमाईचें नाहीं, त्यावर उपजीविकेच्या अथवा चैनीच्या संबंधानें तुमची मुळींच सत्ता नाहीं. जेवढें तुह्मीं कष्टानें

मिळवाल तेवढेंच तुमचें व तेवढ्यांतच तुह्मीं संतोषानें रहावें. श्रम केल्यावांचून मिळेल तें घेऊं नका आणि अयोग्य उपायानें श्रमापेक्षां अधिक मिळविण्याची हांव धरूं नका. उद्योगाच्या राजमार्गापासून पाऊलभरही ढळूं नये. जुगार, सोडत, विमा, हेही चोरीचेच सुधारलेले प्रकार होत; त्यांचा त्याग करा. परोपकाराचें काम करावयाचें असलें तरी देखील निर्वाहाचा भार दुसऱ्यावर आपण होऊन घालू नका. स्वतःच्या निर्वाहाची ज्याची त्यानें सोय करावी व नंतर जें पाहिजे तें करावें.

ठराव २०. कार्यसिद्धीसाठीं स्वतःच्या प्रयत्नावर मोठा विश्वास असूं द्या. प्रयत्न न करितां दैवाच्या फेऱ्यावर, देवाच्या दयेवर आणि समर्थांच्या कृपेवर अवलंबून रहाल तर आपल्या हातानें आपलें नुकसान करून घ्याल. स्वतःला साहाय्य करण्याला तुह्मी कंबर बांधून तयार झाला ह्मणजे दैवाची झुकही तुह्मांवरून वाहील व देवाचा प्रसादही पदरीं पडेल. परंतु तुह्मांला दिलेल्या देणग्यांचा, इंद्रियांचा, सामर्थ्याचा, आणि बुद्धीचा, जर तुह्मी आस्थेनें आणि इमानानें उपयोग करणार नाहीं तर दुसरा कोणीही तुमच्या मदतीस धावणार नाहीं. तेव्हां हातून होण्यासारखें जेवढें असेल तेवढें अगोदर करा ह्मणजे त्याहून अधिक प्राप्त व्हावें अशी इच्छा असल्यास, पूर्वी केलेल्या उद्योगामुळें वाढलेल्या सामर्थ्यानुरूप, इच्छेप्रमाणें अधिकही काम तुमचेंच हातून होईल. गुणांचा उपयोग केल्यानें गुण वाढतात व सामर्थ्याचा उपयोग केल्यानें सामर्थ्य वाढतें. अधिक गुण आणि अधिक सामर्थ्य हवें असेल तर त्यांचा उपयोग करा ह्मणजे जितका अधिक उपयोग कराल तितका अधिक लाभ होईल. दुसऱ्या कोणत्याही उपायानें व दुसऱ्या कोणत्याही गुप्त मार्गानें सामर्थ्याची आणि यशाची प्राप्ति होणें अशक्य आहे. सामर्थ्य आणि योग्यता वाढवून घेणें ज्याचें त्याच्या हातीं ठेविलें आहे, व तें ज्याचें त्यानेंच केलें पाहिजे. तथापि प्रत्येकाचें सामर्थ्यास निरनिराळी मर्यादा असल्यामुळें तिच्या पलीकडे त्यास सरतां न आल्यास त्याबद्दल त्यानें बिलकुल खेद करूं नये.

परंतु प्रत्येकानें आपली पराकाष्ठा करून त्या मर्यादेपर्यंत जाऊन पोहोंचणें हें त्याचें मुख्य कर्तव्य आहे. तें ज्यानें नीट बजाविलें त्यानेंच आपल्या जन्माचें सार्थक करून घेतलें असें समजलें पाहिजे.

ठराव २१. मागून कोणतीही वस्तु मिळवूं नये; योग्यतेनें मिळवावी. मागून मिळविल्यानें दुसऱ्याचें मिंदे होऊन रहावें लागतें, व प्रयत्नानें मिळविल्यापासून मिळविण्याची योग्यता अंगीं येते आणि बोज राहतो. याचना करणें ह्मणजे प्रयत्न करणें नव्हे. प्रयत्नानें जोंपर्यंत एखादी वस्तु तुह्मास मिळवितां येत नाहीं, तोपर्यंत तिचा उपभोग घेण्यास व सांभाळण्यास तुह्मी योग्य झाला नाहीं असें समजावें, व योग्यता येण्या-पूर्वीं एखाद्या वस्तूचा अभिलाष धरणें वेडेपण होय. वास्तविक पाहतां वस्तूपेक्षां वस्तुप्राप्तीविषयीं योग्यता विशेष महत्वाची होय, हें तत्व नेहमीं ध्यानांत ठेवा. तुह्माला सामाजिक सुधारणा पाहिजे, राजकीय हक्क पाहिजेत, सुखाचीं साधनें पाहिजेत; तीं सर्व तुह्मी स्वतःच्या बळानें योग्य होऊन मिळवा आणि सांभाळा. योग्यतेपूर्वीं सोनें, माणकें जरी तुह्माला मिळालीं, तरी तुमच्या हातीं त्यांचे कोळसे होतील; आणि तेच योग्यता आल्यानंतर हातच्या कोळशाचीं रत्नें बनूं लागतील. वस्तु प्राप्त झाली ह्मणजे योग्यता येत नाहीं; पण योग्यता आली ह्मणजे वस्तु पाठीस लागतील. आयतें मिळाल्यानें मिळविण्यास लागणारें शहाणपण आणि सामर्थ्य कधीं प्राप्त होणार नाहीं, व तुह्मी दुर्बळ राहाल आणि एखादे दिवशीं हातचें गमावून दुःख कराल. आपली खेळायाची बाहुली काखेंत घेऊन एखाद्या ढवळ्या ‘ क्ष ’ च्या किंवा ‘ य ’ च्या खांद्यावर बसून मोठाले हक्क मागण्यासाठीं समर्थाच्या दाराशीं जाऊन आपला अपमान करून घेऊं नका, व वाहून नेण्याच्या श्रमाबद्दल हेलकऱ्यास फुकाचे पैसे भरून स्वतःच्या दारिद्र्यांत भर घालूं नका. तुह्माला जें पाहिजे असेल तें मिळेल; मात्र तुह्मी योग्य व्हा. मिळत नाहीं तोंपर्यंत योग्य नाहीं, हें खचित. तुमच्या मेंदूत जोम भरू द्या, मनगटांत बळ येऊं द्या, पिशवींत पैसा जमूं द्या, व समाजांत एकी शिरूं द्या. एवढी तुह्मांकडून तयारी झाली ह्मणजे देणारे आर्जव करून

पाहिजे असेल तें तुमच्या पदरांत बांधूं लागतील, व सृष्टीच्या भांडाराच्या किल्ल्या आपोआप तुमच्या हातीं येऊन पडतील. याचना करूं नका, फुकाचे कोणाचे आर्जव करूं नका. मागण्यानें कदाचित् नीट मागतां येईल; पण मिळविल्यावांचून कधींही नीट मिळवितां येणार नाहीं, आणि मिळालेलें सांभाळितां येणार नाहीं. आधीं योग्य व्हा, आणि मग इच्छा करा.

ठराव २२. आयुष्याचा क्रम सारखा चालला असतांना तें सुखानें जरी जात असलें, तरी कालांतरानें कंटाळवाणें वाटूं लागेल. त्यांत पालट पाहिजे आहे. नित्याच्या व्यवहारचिंतेनें आणि जीवनार्थ जारी खटाटोपानें आलेला शीण भागविण्यासाठीं, नित्याच्या संसारक्रमाच्या बंधनांतून कांहीं वेळ मोकळें होऊन स्वच्छंदानें मोकळी हवा, स्वैर विहार आणि निर्भेळ सुख यांचें सेवन घडावें, यासाठीं व कल्पनेला जी स्थिति सुखदायक वाटते, पण व्यवहारांत अनेक कारणामुळें जिचा अनुभव घडून येत नाहीं, ती स्थिति निदान चार दोन दिवस तरी प्राप्त व्हावी यासाठीं वार्षिक, त्रैमासिक उत्सव निर्माण करावे. यात्रा, प्रदर्शनें, खेळ, मेळे, सण, सभा, इत्यादि उत्सवाचे अनेक प्रकार आहेत. त्यांचे पुनरुज्जीवन करून, त्यांत हवे तितके फेरफार करावे व त्यांत आणखी भर घालावी. धर्म, नीति, शास्त्र, कला, समाज, राष्ट्र, इत्यादि अनेक प्रकरणांचा विचार व्हावा; त्यासंबंधानें आजपर्यंत झालेलें काम पाहतां यावें व पुढच्या कामाची तजवीज लावितां यावी ह्मणून, निरनिराळ्या राष्ट्रीय संस्था उभारिल्या पाहिजेत व त्यांचीं कामें नियमानें, नेटानें, व उल्हासानें चालविलीं पाहिजेत. त्याचप्रमाणें स्वदेशांत घडलेल्या विशेष मोठ्या व चांगल्या प्रसंगाचें स्मरण सर्वांच्या अंतःकरणांत नित्य, नवें, ताजें, रहावें याकरितां त्यांचीं स्मारकें करून दरवर्षी ज्यांच्या बुद्धिवैभवामुळें, पराक्रमामुळें अथवा देवदयेमुळें स्वदेशाचें अपरिमित हित झालें आहे. अशा ज्ञात्यांची, शूरांची, आणि संतांची वर्षश्राद्धें करून त्यांच्या उपकाराविषयीं कृतज्ञता आणि थोरपणाविषयीं पूज्यबुद्धि प्रदर्शित करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य होय. कुटुंबाला वंद्य आणि

स्मरणीय असलेल्या पितरांचें जसें तुह्मीं वर्षश्राद्ध करितां व त्यांच्या स्मरणानिमित्त एक दिवस पाळितां, त्याचप्रमाणें राष्ट्राला वंद्य झालेल्या राष्ट्रपितरांचींहीं वर्षश्राद्ध अथवा पुण्यतिथि करून त्यांच्या चरित्राच्या श्रवणांत व त्यांच्या सत्कृतींच्या चर्चेंत आणि चिंतनांत प्रत्येक देशभक्तानें प्रतिवर्षीं कांहीं दिवस मोठ्या आनंदानें घालविले पाहिजेत. सर्वांचा जेणेंकरून एक विचार होईल, संघट्टनानें सर्वांचें जेणेंकरून संमेलन होईल व मिलाफानें जेणेंकरून मोठालीं कामें करितां येतील, अशा राष्ट्रीय संस्थांची जीवापलीकडे जतन करावी आणि जीवयात्रा सुखावह करणारे आणि कर्तव्य-बुद्धि जागृत राखणारे सर्व उत्सव संतोषानें चालवावे. त्यांची व्याप्ति खेड्यापाड्यापर्यंत पोहचवून त्यांची उपयुक्तता वाढवावी व सर्वांच्या अंतःकरणांत राष्ट्रीय संस्थाविषयीं समजूत, अभिमान, प्रेम, व आदर-बुद्धि, उत्पन्न करावी. संस्था तेव्हांच सजीव झाल्या असें समजावें व त्यांची प्राणप्रतिष्ठा तेव्हांच झाली असें समजावें कीं, जेव्हां त्या लोकांच्या हृदयांत घरें करून राहतील, तोंपर्यंत त्या पाषाणवत् होत. एकंदरींत सर्व देशभर जगण्याविषयीं आणि संसाराविषयीं आस्था, सुखाचा आणि ज्ञानाचा-हव्यास, कर्तव्याची जागृति, स्वातंत्र्याची आणि यशाची हौस, दृष्टीस पडूं लागली पाहिजे व सर्व राष्ट्र सजीव, समंजस, आणि उद्योगशील बनलें पाहिजे.

ठराव २३. तुमच्या एका गालांत कोणी मारिलें असतां तुह्मी त्याच्या दोन्ही गालांचा समाचार घ्या. उपकार तसाच अपकार सव्याज परत करा. प्रत्यक्ष ब्रह्मदेव कां असेना, अन्याय कोणाचाही सहन करूं नका. विनाकारण अपकार कोणाकडूनही झाल्यास तसें करणें योग्य नव्हे, याविषयीं तुमच्यांत जितकें सामर्थ्य असेल तितकें खर्च करून, त्याची खात्री करा. गैरशिस्त सहन करूं लागला आणि नुकसान व त्रास सोशिक मेंढरासारखें निमूटपणें सोसून घेऊं लागला ह्मणजे आजच्या कडव्या जीवनार्थ कलहांत कोणीही दुष्ट येऊन तुह्मास सहज तोंडांत टाकील आणि आपली भूक भागवील. असल्या विषारी वर्तनाचा अंकुर वाढूंच देऊं नये. आपल्या वाटेंत भुईवर निघालेला अंकुर दिसल्यावरोबर

त्यास उपटून टाकावा. त्याची दया करणें ह्मणजे स्वत: विषयीं निर्दय होण्यासारखें आणि त्याला वांचविणें ह्मणजे स्वत:च्या मरणाची तयारी करण्यासारखेंच होय. हिंसक पशूला जर माणसाची आहे तशी जरब नसती, तर त्यानें वस्तींत शिरून माणसास कधींच स्मशानांत पाठविलें असतें. दुसऱ्यानें निष्कारण अपकार केल्यास त्यास शासन जरूर पाहिजे. तें स्वत:ला झालेल्या त्रासाबद्दल सूड घेण्याच्या दुष्ट बुद्धीनेंच करावयाचें असें नाहीं; तर सुखाच्या आणि प्रगतीच्या कार्यांत त्याच्या अथवा त्याच्यासारख्या इतरांच्या अन्यायापासून अथवा दुर्बुद्धीपासून पुन: कोणाला तसला त्रास होऊं नये, ह्मणून, समाजाच्या हिताकरितां असले अपराध शिक्षेवांचून पचूं देऊं नयेत.

ठराव २४. प्राप्तीचा निदान सोळावा हिस्सा दानधर्माकडे खर्च झाला पाहिजे. परिणामीं प्रत्येक व्यक्तीचें हित साधून देणारीं अनेक सार्वजनिक कामें आहेत. अशा सामाजिक, राजकीय, धार्मिक आणि शास्त्रीय कार्यांना सर्वांनीं आस्थेनें आणि आभिमानानें सारखा हातभार लाविला पाहिजे. दीनांचा आणि दुर्बलांचा परामर्ष घेतला पाहिजे. तसेंच सार्वजनिक कार्याकरितां निरपेक्ष बुद्धीनें जे आचार्य झटत असतील, त्यांच्या उपजीविकेची तर्तूद सर्वांनीं मिळून ठेविली पाहिजे. समाजाला मार्गदर्शक आचार्य पाहिजेत यांत संशय नाहीं, व सामान्य माणसासारखी निर्वाहाची चिंता त्यांच्याही मागें लाविल्यास तत्वशोधनाचें, ग्रंथरचनेचें आणि लोकशिक्षणाचें काम त्यांच्या हातून कदापि नीट होणार नाहीं. तेणेंकरून व्यक्तीच्या आणि समाजाच्या हितास अपाय होईल. तेव्हां केवळ स्वहितासाठीं आचार्यवर्गाच्या चरितार्थाची तुह्मी श्रद्धापूर्वक सोय करावी. दानधर्मांत पात्रापात्र विचार होत असावा. अपात्रीं दानाचा दोष फार आहे. कारण त्याचे दुष्परिणाम फार आहेत. आयत्याला धर्म करून भरतभूमीचा भार वाढवूं नका, भिकाऱ्याला भीक वाढून भिकेची तयारी करूं नका, व्यसनग्रस्ताला पोसून दुर्व्यसनास उत्तेजन देऊं नका, टोणप्यास पाळून सरस्वतीचा उपमर्द करूं नका, आणि एकंदरींत उत्पन्न करण्यासारखें असून जें कांहींच उत्पन्न करीत नाहींत अथवा

राखीत नाहींत त्यांना फुकाचें जगवूं नका. अपात्रीं दानाचा दोष ज्या समाजांत घडत असतो, त्याला त्याच्या चुकीमुळें क्षयाची भावना होते आणि कितीही उत्तम अन्न त्याला चारिलें तरी तो अंग धरीत नाहीं. भरतवर्षाला ही कीड लागली आहे. जवळ जवळ कोट भिकारी प्रत्यही त्याच्या अंगाचें मांस तोडतोडून खात आहेत आणि स्वतःला जगवून त्याचा जीव घेत आहेत. त्यांना अगोदर नाहींसें करा. तुमची ही भूतदया भलतीकडे वहात असल्यामुळें तुह्मांसच प्राणघातक होत आहे. सत्पात्रीं द्यावेंसें वाटून देणें हेंच दान; मागेल त्याला कंटाळून देणें दान नव्हे. जे गुणसंपन्न आहेत, सदाचरणी आणि सुशील आहेत, अध्ययनांत आणि अध्यापनांत जे निमग्न आहेत, स्वहित सांडून लोकहित तेंच स्वहित मानून लोककल्याणार्थ जे अहर्निश झटत आहेत, जे धीर, उदार, आणि गंभीर आहेत, ज्यांनीं ब्रह्मचर्यव्रताचा अंगीकार केला आहे आणि स्वतःच्या संसाराचा त्याग करून मोठा सामाजिक संसार डोईवर घेतला आहे, अशा समाजप्रतिपालक आचार्यांपैकीं तुमच्या आवडीप्रमाणें पुष्कळांविषयीं अत्यंत पूज्यभाव असावा आणि जे तुह्मास वंद्य असतील त्यांच्या उपजीविकेची त्यांस शरण जाऊन सोय करावी. त्याचप्रमाणें जीं शेंकडो सामाजिक कार्यें तुह्मास चालवावयाचीं आहेत त्यांना मदत करणें आणि अपंग, व्यथित, वृद्ध आणि दीन असतील त्यांच्या उपजीविकेची कायमची व्यवस्था लावणें तुमचें कर्तव्य आहे. तुमची इष्ट वस्तु मोबदल्यांत मिळाल्यावांचून कोठें कांहीं देऊं नये. आचार्यांपासून ज्ञान प्राप्त होतें, दीनाच्या रक्षणापासून प्रेमाचें कर्तव्य साधिल्याचें समाधान होतें, आणि सामाजिक कार्यांपासून देशोन्नति होते.

ठराव २९. तुह्मी कदापि दीन असूं नका आणि दिसूं नका. कोणत्याही संकटानें आणि कसल्याही विपत्तीनें तुह्मी हादरतां उपयोगी नाहीं. कोणत्याही अनिष्टापुढें तुह्मी कचरतां कामा नये. संकटाला तुह्मी संकटाप्रमाणें वाटावे आणि अडचणीला उलट तुमची अडचण व्हावी. मल्लाशीं झुंजण्यानें जसे स्नायु सुदृढ होतात, तसेंच प्रतिकूल प्रसंगांतून निश्चयानें पुढें जात असतांना मनाचें सामर्थ्य वाढतें आणि

तेथें धैर्याचें स्फुरण होतें. तुह्मांला सामर्थ्याची इच्छा आहे तेव्हां तुह्मी संकटाला कंटाळू नये. मनाचा जोर सतत कायम ठेवावा. धैर्याच्या आणि उद्योगाच्या भात्यानें उल्हासाची ज्योति सदोदित प्रज्वलित राखावी आणि तिच्या ज्वालेनें वाटेंतील साऱ्या अडचणी जाळून टाकाव्या. जें पाहिजे तें मिळविण्याकरितां होईल तेवढा प्रयत्न करीत असावा आणि मिळेल त्यांत, अधिक मिळविण्याविषयीं प्रयत्न करीत, आनंदानें रहावें. खिन्न, दीन, आणि हताश होण्याचें कांहीं एक कारण नाहीं. इच्छेप्रमाणें सर्व प्राप्त होईपर्यंत तृप्त होऊं नका, आणि तृप्ति होईपर्यंत उद्योग सोडूं नका. आज न प्राप्त झालें तर उद्यां होईल; पण इच्छा आणि यत्न असल्यास कधींना कधीं प्राप्ति खचित होईल. प्राप्तीची इच्छा सफल करण्यास प्रयत्न हाच उपाय आहे, चिंता नव्हे. व्यर्थ चिंतेनें लाभ घडत नाहीं. इतकेंच नव्हे तर उलट प्रयत्नांत व्यत्यय येतो, आणि जीवाला व्यर्थ त्रास होतो. तांब्याचें सोनें करण्याची किमिया करा, मोठ्या उत्कंण्ठेनें करा; परंतु निग्रहानें व नेटानें ती साधीत असतांना सुवर्णपतीच्या अंतःकरणांत सांपडणारें धैर्य, उत्साह, निष्काळजी स्वस्थता इत्यादि गुण तुमच्यांत टिकून राहिले पाहिजेत. प्रयत्नाची सारी खुबी हीं टोकें मिळविण्यांत आहे. इकडे उद्योगाच्या वेगांत कमी होऊं नये, आणि तिकडे मनांत मऊपणा, मिंधेपणा, दैन्य, भय, चिंता, अस्वस्थता, उत्पन्न होऊं नये. तुह्मीं गरीब असला, तुह्मीं कृश असला, तुह्मीं विद्याहीन असला, किंवा तुह्मीं सत्ताहीन असला तथापि विद्वान्, श्रीमान्, पैलवान, आणि सत्ताधीश यांशीं गांठ पडली असतांना मी दीन, मी बापुडा, मी नादान, मी मलिन आहे, असा विचार मनांत येऊन गोगलगाईसारखें गरीब आणि पाण्याहून पातळ होऊं नका, व आपला ताठपणा सोडूं नका. मात्र आपली स्थिति विसरू नका, व त्यांच्यासारखे होण्याच्या प्रयत्नांत कसर करूं नका. दरजा कोणताही असो, योग्य सन्मान सर्वांचा सारखा राखावा, आणि विशेष योग्यतेच्या मानानें चित्तांत विशेष आदरबुद्धि वसावी आणि कृतींतही तशीच दिसावी; परंतु दीन ह्मणून कोणापुढेंही होऊं नये.

आणि दुसऱ्याच्या तेजाला अजागळासारखे दिपून दिवाभीताच्या पंक्तीस जाऊन बसूं नये. तुह्मी दैत्यापुढें दबूं नका, सत्तेपुढें लवूं नका, विद्वानापुढें विरघळूं नका, आणि श्रीमानापुढें घाबरूं नका. सत्याला मात्र सोडूं नका, आणि प्रामाणिकपणानें आपलें कर्तव्य चालूं ठेवा. गरीबीच्या गाढवावर बसला असला तथापि सरदाच्या रथाला खेटून ऐटींत आपल्या वाटेनें पुढें निघून जा. आधींच स्थितीनें जें खालीं घसरले आहेत त्यांनीं दैन्य वृत्तीचें जड दडपण डोईवर ठेवून अधिक खालीं जाण्याची तयारी करावी हें शहाणपण नव्हे. मन सदोदित ताठ राखावें, आणि तें उल्हासानें, आवेशानें, आणि आशेनें, भरलेलें असावें. फुकाचें दैन्य काय ह्मणून? योग्यतेप्रमाणें प्रयत्नाअंतीं जें मिळेल, त्यांत संतुष्ट राहून अधिकाच्या प्राप्तीकरितां अधिक उद्योग करितां येत नाहीं काय? संतोष ही गरीबापासून श्रीमंतापर्यंत प्रभूची सर्वांना सारखी देणगी आहे. ती कायम राखून हवा तितका उद्योग करितां येतो. थोराकडे उन्मत्तपणा असल्यावांचून लहानाकडे दीनपणा दिसत नाहीं. दोन्ही बाजूस दोन्ही दोष असूं नयेत. प्रेमभावानें सारा व्यवहार चालत असावा, आणि ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें ज्यानें त्यानें प्रयत्न करीत असावा, आणि यश मिळवीत असावें. ज्या समाजांत वरील दोष आढळतात, तेथें मनुष्यपण पुरतेसें उदयास आलें नाहीं, असें खचित समजावें. थोरांनीं आपल्या ऐश्वर्याच्या घमेंडींत लहानांना तुच्छ मानूं नये, आणि लहानांनीं थोरांची योग्यता जाणून मनाचा ताठपणा आणि संतोष हलूं देऊं नये. आणि स्वत:स थोरपण आणून घेण्याच्या प्रयत्नांत अंतर पडूं देऊं नये.

ठराव २६. अंत:करण वज्रापेक्षां कठोर आणि कुसुमापेक्षां मृदु असावें. कठिण कर्तव्यांत सुख वाटावें, आणि मृदु सुखासाठीं कठिण कर्तव्य करावें. विद्या, सुख, सत्ता, स्वातंत्र्य, आणि ऐश्वर्य हीं सुलभ उपायांनीं साध्य होत नाहींत. त्याकरितां मोठें खडतर तप करावें लागतें. मोठ्या बिकट वाटेनें, अडचणींना तोंड देत आणि नानाप्रकारच्या संकटांवर सरशी करीत, पुढें चाल करावी लागते व रात्रंदिवस आपल्या हेतूंविषयीं दक्ष रहावें लागतें. त्यावांचून आजपर्यंत कोणत्याही व्यक्तीला, अथवा

राष्ट्राला त्या इष्ट वस्तू साध्य झाल्या नाहींत. व पुढेंही त्यांच्या प्राप्तीविषयीं कोणास उत्सुकता असल्यास, एवढा त्रास संतोषानें सोसण्यास तयार झाल्यावांचून त्यांची प्राप्ति होणें अशक्य आहे. शिवाय जी वस्तु तापावयाला अधिक वेळ लागतो, तिला निवावयालाही अधिकच वेळ लागतो, तद्वत् मनुष्यजन्माचें सार्थक करून देणारे जे मोठे लाभ आहेत, ते लाभावयाला जसा अधिक आयास पडतो, तसाच ते सांभाळावयालाही त्या मानानें विशेष परिश्रम आणि दक्षता पाहिजे आहे. हजारों सत्पुरुषांचे हजारदां बळी देऊन, शतकेंच्या शतकें उग्र तपश्चर्या करून, दिवसाची रात्न करून, आणि जीवाची नांव करून, जें ऐश्वर्य आणि जो ऐहिक भोगरूप मोक्ष राष्ट्रानें संपादन केला, तो वंशपरंपरेनें स्वाधीन ठेवण्याकरितां ज्या गुणांनीं आणि ज्या प्रयत्नांनीं मिळविण्याचें कामीं साहाय्य केलें, त्याच गुणांची व तितक्याच व तशाच प्रयत्नांची आवश्यकता आहे. हा प्रयत्न ह्मणजेच कर्तव्य. प्रयत्न ह्मटला ह्मणजे तेथें युक्ति, पराक्रम, साहस, सहनशक्ति, आणि धैर्य इत्यादि गुणांची अपेक्षा उत्पन्न झाली. ते सर्व पाहिजेत व ते सर्व कठोर—गणांतील गुण आहेत. उग्रता त्यांचें जीवन होय, मऊपणाशीं, शिथिलतेशीं, नम्रतेशीं, भित्रेपणाशीं त्यांचा अगदीं विरोध आहे; ह्मणून त्यांना संपादीत असतांना आणि राखीत असतांना या मेषवृत्तींना आपल्या वाऱ्यास देखील उभे राहूं देतां नये. यशाला सर करीत असतांना मनांत जितका कठोरपणा असेल, तितका थोडाच. उग्रता, निग्रह, साहस, सहनशक्ति आवेश, दृढ निश्चय हीं सारीं त्या कठोरपणाचीं रूपें होत. तो कां असावधपणानें तुह्मीं घालविला, कीं त्याच्या पाठोपाठ तुह्मीं गेला, ह्मणून समजा. कठोरपणाविषयीं जर कां तुह्मीं कठोर झाला, तर तोही तुह्मांवर कठोर होईल, आणि तुमचा पुरता सूड उगवील. जीव सुखाचा भुकेला आहे, व तें त्याला पोटभर मिळवून देणें प्राणिमात्राचें अत्यंत महत्वाचें कर्तव्य आहे; परंतु तें सुख प्राप्त करीत असतांना आणि सांभाळीत असतांना सुखाच्या आशेनें, जें कर्तव्य, निग्रहानें आणि नेटानें पाळावें लागतें, त्यांतही त्यांपासून परिणामीं उत्पन्न होणाऱ्या सुखाइतकेंच सुख मानावयास तुह्मीं शिकलें पाहिजें. तसें न होईल तर सुखाची

अतिशय उत्कंठा असूनही तुह्मीं असुखी रहाल. सुखदायक प्रयत्नही सुखाशीं गांठ घालून देणारा ह्मणून सुखाइतकाच सुखकर वाटला पाहिजे. व तो तसा वाटण्याकरितां मनाचें अंगीं कठोरपणा राखिला पाहिजे. कारण सुख सुखाचें आहे, परंतु सुख–प्राप्तीचें कर्तव्य कष्टाचें आहे, आणि कष्टाचा समाचार कठोरपणावांचून घेतां येणार नाही. तेव्हां सांपडलेल्या सुखाचा उपभोग घेत असतांना तुमचें अंतःकरण मृदुवृत्तींनीं सुखाशीं समरस होऊन त्यांत स्वस्थपणें तरंगत रहावें, व मिळालेलें सुख चिरकाल कायम राखण्याकरितां आणि न मिळालेलें काबीज करण्याकरितां जो कठिण प्रयत्न अथवा जें कर्तव्य करावयास पाहिजे, त्यासाठीं अंतःकरणांत वज्रासारखा कठोरपणाही असावा. शिथिलपणांत सुख नाहीं; परंतु केवळ सुखाच्या सेवनांत गर्क होऊन कर्तव्याची तुह्मांकडून उपेक्षा झाल्यास मात्र शिथिलता तुह्मांत शिरेल, आणि सुखाच्या इच्छेसकट स्वतःस कायमचें हरवून बसावें लागेल. **शंकराला** प्रसन्न करून घेण्याकरितां **रावणानें** आपलीं नऊ शिरें फुलासारखीं काढून पिंडीवर समर्पण केलीं आणि जीवासह दहावें काढून वाहणार तों **रावणा**चा कठोर निश्चय पाहून जगाचा संहारकर्ता **महेश्वर**देखील त्याच्या संरक्षणासाठीं धांवून आला आणि भक्ताची उग्र तपश्चर्या पाहून त्यास अभीष्टवरप्रदानानें कृतार्थ केला. या गुणांत रावणाचें सर्वांनीं अनुकरण केलें पाहिजे, आणि सारीं पंचमहाभूतें चाकरीस राबविलीं पाहिजेत व जगाच्या सुखदुःखाला वर्तविणाऱ्या नवग्रहांना पायरीखालीं पालथें घालून त्यांना आपल्या तंत्रानें वर्तविलें पाहिजे. काव्य, अलंकार नाटकें, शृंगार आणि भोग अथवा चैन यांच्यायोगानें मनांत मऊपणा शिरतां उपयोगीं नाहीं. रसिकता आणि सहृदयता तुमचे ठिकाणीं जरूर पाहिजे. कर्तव्यसाधनाला लागणाऱ्या उग्र निग्रहाशीं रसिकतेचा विरोध नाहीं. तो दोष येथें उत्पन्न न होतांना जेवढा सुखोपभोग घडेल तेवढा घडेल; बाकी मनाची स्थिति बिघडवून परिणामीं अनर्थ उत्पन्न करणारा उपभोग भोग्य नव्हे. माणसाला साऱ्या शक्तीचा पुरवठा मनोवृत्तीपासून आहे. तेथेंच जर कोमलता आणि मृदुलता सर्वांशीं उत्पन्न झाली, तर त्याला वांचविण्याला कोणीही समर्थ होणार नाहीं, व

ज्याचें त्याच्याही स्वाधीन राहणार नाहीं. सुखसेवनाच्या दुष्परिणामाविषयीं फार सावध रहा. सुखानें मनाला मळवावें, हा त्याचा स्वाभाविक धर्म आहे; परंतु त्या परिणामाचा अतिरेक केंसभरही होऊं नये. कष्टाला आणि संकटाला भीऊं नये; कारण त्यांच्यासारखा दुसरा मित्र नाहीं व त्यांच्या इतकें जगाचें हित दुसऱ्या कोणाकडूनही झालें नाहीं. महावृक्ष वादळाशीं झगडून आणि पावसाची थोप सोसून सुदृढ होतात. त्याच प्रमाणें इष्ट फलाच्या प्राप्तीकरितां पाहिजे असलेली योग्यता माणसांनीं संकटाशीं सामना करूनच मिळविली, परंतु इष्ट फलाचा ह्मणजे सुखाचा मात्र परिणाम अनिष्ट झाला व पुढेंही असाच होणार. **भस्मासुरानें** इष्ट ह्मणून जो वर मागून घेतला, तो जसा शेवटीं त्यालाच जाळावयाला कारण झाला, त्याप्रमाणें इष्ट ह्मणून धडपड करून मिळविलेलें सुखही माणसाच्या नाशाला मूळ होतें. माणूस सुखाकरितां झटतो व शेवटीं तेंच सुख त्याला मारण्याला प्रवृत्त होतें. तुह्मी सुख, **जनक** राजाप्रमाणें घेतलें पाहिजे. त्यानें आपला एक पाय कर्तव्याच्या शेगडींत ढलप्या सारखा जळत ठेविला होता व तोच दुसऱ्या पायास उपभोगाचें मृदु नवनीत चोळवीत होता. त्याच प्रमाणें प्राप्तसुखाचा आस्वाद घेत तुह्मी कर्तव्याला सदा सज्ज असलें पाहिजे. श्रमाचें कर्तव्य बजावीत असतांना उपभोगाचें सुख घेतां येत नाहीं. मात्र उपभोगामुळें तुमच्या मेंदूतील कण आणि रक्तांतील परमाणु विरल आणि शिथिल आणि मऊ, आणि ठिसूळ होऊं नयेत, आणि कर्तव्यानें कसलेल्या तुमच्या स्नायूंतील पीळ उकलून सैल पडूं नयेत. सुखानें सिंहासनावर बसून राज्य करावें अशी इच्छा करणाऱ्यास, सख्या **कौसल्या**मातेपेक्षां खडतर वनवासांत पाठविणाऱ्या दुष्ट सापत्न माता **कैकेयी**चेच आपणावर अधिक उपकार आहेत असें मानून परम पूज्य **रामराजा**नें, दृष्टि आणि ज्ञान विस्तीर्ण करणारा, सहनशक्ति वाढविणारा, अनुभव देणारा, सत्पुरुषांशीं संयोग घडविणारा खडतर वनवास अथवा प्रवास, मोठ्या आदरानें स्वीकारिला. त्याचप्रमाणें स्वहितासाठीं तुह्मी उद्योगाला सोडूं नका, संकटाला भिऊं नका, आणि अडचणींना मोजूं नका. आपल्या सुखाकरितां होईल तितका प्रयत्न केलाच पाहिजे; परंतु स्वहिताशीं ज्यांचा साक्षात् संबंध

नाहीं, अशा सामाजिक आणि राष्ट्रीय हिताच्या कर्तव्यांत तर त्याहून अधिक नेटानें झटलें पाहिजे. विलासांनीं शरीर आणि मन नाजुक होऊं नये. त्यांत जोम आणि तरतरीतपणा सदोदित कायम असावा. सुगंधि तेलांनीं अभ्यंग करून आणि मलमलीच्या पोषाखांनीं नटून आणि साहसाला विटून, नाजुकपणांत स्त्रियांवरही सरशी करण्याची चढाओढ तुह्मी चालविली आहे, ती अगदीं अयोग्य आहे. ग्रीस आणि रोम यांचा गळा शेवटीं सुखानेंच कापला, आणि तुमचीही चिता त्यानेंच पेटविली. मिळवेल तितकें सुख मिळवा आणि सेवन करा; कारण त्यासाठीं साऱ्या खटाटोपाची प्रवृत्ति आहे. परंतु त्याचें अजीर्ण होऊं देऊं नका व जें अनेक प्रकारचें कर्तव्य तुह्मांस करावयाचें आहे, त्यांत व्यत्यय येऊं देऊं नका. केवळ सुखाच्या स्वाधीन झाल्यानें कर्तव्यहानि होते, कर्तव्य सुटल्यावर योग्यता उणी होते आणि योग्यतेच्या अभावीं व्यक्तीचा आणि समाजाचा नाश होतो. मनाला पाळण्यांत घालून अंगाई करणारीं गीतें तुह्माला नकोत. मनाला शांत करणारे अथवा शिथिल करणारे उत्तर रागही तुह्मांस अधिक नकोत. वीज, मेघ आणि झंझावात यांच्या संयोगापासून वर्षाऋतूंत अंतराळांत जें संगीत उत्पन्न होतें, तसलें आज तुह्मांस पाहिजे, कीं जेणें करून मन थरारून जाईल, बाहु स्फुरण पावतील, आवेश मावेनासा होईल आणि अंतःकरण उल्हासभरित होऊन सह्याद्रीवरून ताडकन् पलीकडे उड्डाण फेकावेंसें वाटेल. ती शोकाश्रूंनी थबथबलेलीं आणि पासल्या सुरांत रचिलेलीं अथवा जनानी शृंगाररसानें भरलेलीं कवनें तुह्मीं पसंत करूं नये. सैल सुरांनीं आणि शिथिल वृत्तींनीं तरुणपणींच ह्मातारपण आणून घेऊं नका. रग रगड राखा आणि तारुण्य कदापि ढळूं देऊं नका. मनाचें क्षात्रतेज ज्या व्यवसायांत कायम राहील त्यांतच सुख वाटलें पाहिजे, ह्मणजे दंग्याची भीतीच नाहीं. या उग्र तेजाशीं दया, माया, रसिकता इत्यादि सौम्यवृत्तींचा विरोध नाहीं. हें ध्यानांत ठेवा. बाळपणचा उत्साह, आनंद आणि वाढ, यांचा प्रौढ अवस्थेंतील दूरदृष्टि, अनुभव आणि परिपक्वता यांशी मिलाफ होऊन जोडीनें हे सर्व गुण अंतःकरणांत सदोदित सारखे राहिले पाहिजेत.

उपवास, उन्ह, तहान, थंडी, दु:ख, श्रम, आणि संकट, सोसण्याला नेहमीं तयार असले पाहिजे. व तेवढी सहनशक्ति अंगात आली पाहिजे. सत्कार्यीं प्राण वेंचायास तयार असलें पाहिजे. रक्त, मरण, हिंसा आणि क्लेश यांचें नुसतें नांव कानीं पडलें तरी ज्यांच्या अंगावर शहारे उठतात, त्या तुमच्या हातून, साहस तें काय होणार व त्या तुमचा पुरुषार्थ तो काय तडीस लागणार? आज समाजांतील दैन्यरूपी व अज्ञानरूपी दैत्यांशीं तुह्माला सामना करावयाचा आहे, आधिव्याधि जिंकून सृष्टि पादाक्रांत करावयाची आहे; अशावेळीं नेभळेपणा घर बुडवील. सावध असा, विलासांत देखील कर्तव्यशील असा, आणि झोंपेंत देखील जागे रहा. तुमचे विलासही अशा प्रकारचें असावेत कीं त्यांचे संस्कार कर्तव्य बजाविण्याला अधिक तयार करितील व तुमची झोंपही अशी असली पाहिजे कीं, तिच्या परिणामामुळें जागृतीचीं कामें अधिक जोरानें करितां येतील.

ठराव २७. प्रत्येकाला कोणत्या तरी एका व्यवहारोपयोगीं विषयाची अथवा उद्योगाची विशेष आवड असली पाहिजे. चांगल्या रीतीनें संसार करितां येण्याला, पुष्कळसें ऐश्वर्य आणि सुख मिळविण्याला, सदृढ राहून पूर्णायुषी होण्याला आणि आपलें सर्व प्रकारचें कर्तव्य यथास्थित बजावितां येण्याला प्रत्येक व्यक्तीला जें सामान्य ज्ञान असावयास पाहिजे, तें प्रत्येकानें मिळविलें पाहिजे, आणि वडिलांनीं आणि गुरूजींनीं तें सर्वांना सारखें दिलें पाहिजे; परंतु विलक्षण आवडीचा असा एक विषय अथवा एखादी कला अथवा एखादें काम प्रत्येकानें लहानपणापासून आपलेंसें करून ठेविलें पाहिजे. वेळ फावला कीं, जें हातीं घ्यावेंसें वाटावें, प्रपंचांत थकवा आला कीं, ज्यांत विश्रांति मिळावी आणि करमणूक व्हावी, ज्याविषयीं त्याचा विशेष उत्सुकतेनें शोध चालू असावा, आणि ज्याशीं चित्ताची एकात्मता झालेली असावी, असा, प्रत्येक स्त्रीपुरुषास एखादा विषय अथवा एखादें काम असलें पाहिजे. दहा कामाचे उगाच लचके तोडण्यापेक्षां आणि सर्व गोष्टींत सरसकट सारखें उथळ असण्यापेक्षां, आपापल्या शक्तीप्रमाणें प्रत्येकानें निदान एका विषयाचा तरी यथाशक्ति अंत पहावा व एका कामाची तड लावावी. अशानें

बुद्धि आणि बल वायां जाणार नाहीं व त्यांचें, दुसऱ्याला पाहतां येईल आणि उपयोग करितां येईल, असें चीज करून दाखवितां येण्याजोगें आहे. कोणत्याही कामाचें महत्व अथवा विषयाचा आनंद त्याच्या पृष्ठ-भागांवर सांपडत नाहीं; त्याकरितां त्यांत खोलवर जावें लागतें आणि खरें सुख खरोखर तेथेंच मिळतें. आपल्या सामर्थ्याची प्रत्येकानें पराकाष्ठा केली पाहिजे आणि आपल्या सुखाचें असलें एक साधन प्रत्येकानें साधून ठेविलें पाहिजे. त्याशीं याचा एक जीव झाला पाहिजे आणि जीवासारखीच त्याची जतन केली पाहिजे. आपलासा मानून घेतलेल्या आवडत्या विषयाचें अथवा उद्योगाचें वेड लागलें तरी देखील त्यापासून फायदाच होईल. अशा निःसीम भक्तीवांचून मोठालीं कामें रूपास आणितां येणार नाहींत व अमर्याद आस्थेवांचून मोठाल्या विषयांत मोठाले शोधही लावितां येणार नाहींत. मनुष्यजातीचें अनेक दिशांनीं जें कल्याण झालें आहे, तें सर्व विलक्षण कळकळीचेंच फळ आहे; कारण कळकळीवांचून कामाला स्फुरण चढत नाहीं. यांत स्वतःच्या रंजनाची जो तो सोय करीत असतांना, अनायासेंच समाजाची उन्नति साधत असते. कोणत्याही एका विषयांत अथवा एका कामांत परिपूर्ण होण्यास प्रत्येकानें झटलें पाहिजे. योजिलेला इष्ट अर्थ साधीन किंवा त्या पायीं मरेन; परंतु मरेपर्यंत अर्थाची पाठ सोडणार नाहीं असा दृढ निश्चय पाहिजे. ज्ञानाविषयीं कळकळ आणि कामाविषयीं करारीपणा हे दोन गुण साऱ्या समाजांत समुदायरूपानें आणि प्रत्येक व्यक्तींत अंशरूपानें जितके अधिक उत्पन्न होतील तितकें अधिक कल्याण होईल. नादीपणा हा दोष नसून मोठा उपयुक्त गुण आहे. मात्र त्यामुळें दुसऱ्या महत्वाच्या कार्यांत व्यत्यय येऊं नये. तुह्मांपैकीं सर्वांस एका उपयुक्त गोष्टीचा नाद लागूंद्या आणि तिचा शेवट लावीपर्यंत आणि नंतर तशीच दुसरी एखादी हातीं लागेपर्यंत तिजविषयीं मोठी उत्सुकता आणि कळकळ बाळगा. संसाराच्या लहानशा कूपांत अथवा स्वहिताच्या लहानशा बिळांत कोंडून घेऊन स्वतःला लहान करूं नका. आणि मोठ्या वस्तूच्या परिचयानें आणि सहवासानें प्राप्र होणाऱ्या मोठेपणास मुकूं नका. नुसत्या निवार्हाचें काम पशूपक्षीही

करितात. ज्यापासून माणसाची स्थिति सुधारेल त्याच्या ज्ञानांत आणि सुखांत भर पडेल आणि समाजाची भरभराट होईल असें एखादें लहानमोठें आवडीचें कृत्य, मग तें शोधकांचें असो अथवा शोधकांचें शोध अमलांत आणण्याचें असो, प्रत्येकानें उचलिलें पाहिजे आणि त्यास यथाशक्ति साहाय्य करून आपल्या मनुष्यपणाचा बोज राखिला पाहिजे आणि आपल्या उन्नतीचा मार्ग मळून मोकळा ठेविला पाहिजे. शास्त्रें अनेक आहेत, कला असंख्य आहेत, सामाजिक आणि राजकीय कर्तव्यें बहुत आहेत आणि व्यवसाय सहस्त्रावधि आहेत. त्यांपैकीं ज्याला जें रुचेल तें त्यानें घ्यावें. परंतु सामान्य चरितार्थाच्या चिंतनापलीकडील असा निदान एखादा विषय अथवा असलें एखादें काम अगदीं आपलेंसें करून घेतल्यावांचून कोणीही राहूं नये.

ठराव २८. सर्वांत मनाला आधीं आणि अधिक जपावें. शरीरामध्यें आणि मनामध्यें चिवटपणा आणि लवचिकपणा आमरण कायम राहूं द्यावा. भेद वाढला असतां आणि स्नायु जरठ झाले असतां, शरीरांतील चापल्य, सहिष्णुता आणि शक्ति हीं जशीं कमी होत होत, नाहींशी होतात, तशीच रूढीनीं जखडलीं असतां, दुराग्रहांनीं सुकविलीं असतां पोकळ श्रद्धेनें पोखरिलीं असतां, पराधीनतेनें ठेंचलीं असतां, भयानें भेदरलीं असतां आणि शुष्क सत्तेच्या भाराखालीं दडपलीं असतां माणसांचीं मनेंही निर्जीव, निरुपयोगीं आणि जड होतात. मनाचा लवचिकपणा गेला कीं, मनाचें मनपण आणि आयुष्याचें थोरपण गेलें ह्मणून समजावें. शरीराचा आणि मनाचा लवचिकपणा आहे तोंपर्यंत त्यांच्या वाढीची आशा आहे, आणि वाढ हें सर्वांत अत्यंत महत्वाचें कार्य आहे. तें सजीवपणाचें चिन्ह आहे. ती पराक्रमाची पोषकस्थिति आहे. वाढ खुंटली ह्मणजे मरणाला आरंभ झाला, मरण्याची तयारी करण्याची सूचना झाली असें समजावें. अंतःकरण शुष्ककाष्ठासारखें, जड दगडासारखें अथवा जीर्ण अस्थीसारखें बनत चाललें ह्मणजे माणसानें खुशाल मृत्युपत्र करावें, समाजानें यमाजीस शरण जावें, आणि राष्ट्रानें दांतीं तृण धरावें; पण तोच मनाचा लवचिकपणा सदोदीत कायम

ठेविल्यास ह्मणजे माणसाच्या मनांत उल्हास, उद्योगाची व जगण्याची हौस, ऐश्वर्याची इच्छा आणि साऱ्या समाजांत जागृति आणि चैतन्य भरलेलें असल्यास त्या पुरुषाला आणि त्या समाजाला काळाचेंदेखील भय नाहीं. त्याला काळ आपलें आयुष्य देईल, शत्रु आपलें यश देईल, आणि परमेश्वर आपलें प्रभुत्व देईल. पूर्वीं एकदां उत्कर्ष पावलेल्या देशांतील ऐश्वर्याच्या उदयावरून आणि अस्तावरून हेंच तत्व सिद्ध होतें कीं, मनाच्या वाढीस साहाय्य करणारे आणि त्याचें सामर्थ्य वाढविणारे गुण जोंपर्यंत तेथील लोकांत वसत होते, तोंपर्यंतच त्यांची सरशी झाली, आणि तेथपर्यंतच त्यांनीं मजल मारिली, आणि शेवटीं अंतःकरणांतील चैतन्य कायम राहण्यासाठीं अंतःकरणाची जी स्थिति अनुकूल असावयास पाहिजे, ती प्रतिकूल झाल्याबरोबर जोम हटला आणि आटत चालला; आणि शेवटीं अंगांतील शक्तीचें प्रमाण व्यस्त झाल्यामुळें पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणशक्तीला वश होऊन जड कलेवरासारखीं तीं राष्ट्रें खालीं पडलीं. हा अनर्थ टाळणें प्रभूच्या आशीर्वादानें व्यक्तीच्या स्वाधीन आहे. निदान तसें त्यानें निरभिमानपणानें, परंतु निग्रहानें शेवटपर्यंत मानिलें पाहिजे. आणि नेटानें वरील अनर्थाचा प्रतीकार केला पाहिजे. व्यक्तीचें जें बल तेंच तिच्या मायदेशाचें सामर्थ्य. तेव्हां आपल्या गुणांचा विकास करून आणि आपलें कर्तव्य पूर्णपणें बजावून देशाचा उद्धार करा आणि अवनतीच्या स्थितीपासून त्यास चिरकाल सुरक्षित ठेवा. वेदाचा अंत पाहण्याची वेळ आल्यावर आणि दिसूं लागल्यावर सावकाश पहा; परंतु आरंभीं स्वतःचा, स्वतःच्या बुद्धीचा, ज्ञानाचा आणि सामर्थ्याचा अंत पहा. तुमच्या अंतःकरणाचें आणि शरीराचें बल किती आहे हें पहा; तें कोठपर्यंत वाढवितां येईल याचा विचार करा, आणि तेथपर्यंत निश्चयानें सर्व प्रदेश काबीज करून कृतार्थ व्हा. आपल्या मनाचा विस्तार ज्याला ओळखितां येईल आणि वाढवितां येईल त्यालाच जगाच्या विस्ताराचा थांग लागेल; मनांत गुणाचा ज्याला साक्षात्कार होईल, त्यालाच जगाच्या गुणाचा परिचय होईल; स्वतःच्या सामर्थ्याचा ज्याला उपयोग करितां येईल, त्यालाच जगाचें सामर्थ्य वाढवितां येईल; आत्मीय उत्क्रांति ज्याला साधितां येईल,

त्यालाच जगाच्या उत्कर्षाला साहाय्य करितां येईल; ज्याच्या मनांत सुखाचा झरा लागेल, त्याला सारें जग सुखानें भरलेलें दिसेल, अथवा तसें नसल्यास त्यालाच तें सुखी करितां येईल; मनाशीं माणसाचें कर्तव्य काय आहे, हें ज्याला चांगलें उमजलें आणि बजावितां आलें, त्यालाच जगांत आपलें कर्तव्य कोणतें आहे व तें केव्हां आणि कसें साधावें हें कळेल. मनाशीं मित्रत्व करा. दुनियेच्या फसव्या प्रशंसेला भुलून मनाशीं व स्वतःशीं वैर करूं नका. लोभाविष्ट होऊन द्रव्याकरितां सत्व घालवूं नका. लौकिकाच्या लालचीनें लोकांना फसविण्याचा प्रयत्न करून स्वतःची जन्माची फसवणूक करून घेऊं नका. ज्याचा तो स्वतःला जितकें फसवितो तितकें सारें जग त्याला फसवूं शकत नाहीं. यास्तव मनाला मनस्वी जपावें आणि ज्या स्थितींत तें चढेल, वाढेल आणि डोळस, दक्ष आणि कर्तव्यशील राहील, त्याच स्थितींत त्यांस सदोदित ठेवावें. मनाला माणसानें जपलें ह्मणजे जगत् आणि काल व ज्ञान आणि यश हीं त्याला आपोआप जपूं लागतील. शोधानें, अनुभवानें, विचारानें आणि उद्योगानें मनाचें सामर्थ्य वाढतें. त्याच्या गळ्यांत दगड बांधून निर्विकल्प, शून्य, जड, स्थितींत त्यास ठेविल्यास त्याचा नाश होईल. मनाशीं प्रामाणिक असावें. आणि लोकापवादाकडे, रूढि आत्याबाईकडे, पाठ फिरवून ताठपणें मनःपूत आचरण करावें. नवें असो वा जुनें असो, त्यांत विचाराअंतीं ज्याला जें हितकर वाटेल, तें त्यानें बेलाशक घ्यावें. मनानें तोंडवशीं पडल्यावर सारी दुनिया समाचाराला आली, तरी समाधान होणार नाहीं. जवळचें मन विरुद्ध वागूं लागल्यावर साऱ्या जगाच्या स्नेहापासून सुख होणार नाहीं. एकाचें करणें जगाला रुचेल, असें कधीं होणार नाहीं; तेव्हां तशा अनुभवाची अपेक्षा करूं नका. प्रत्येकाच्या वाटेंत त्याला चार जिवलग सोबती भेटतील; त्यांच्या संगतीनें, प्रामाणिक अंतःकरणाच्या तंत्रानें, सुखाच्या आशेनें, आणि कर्तव्याच्या इच्छेनें, आनंदानें जीवयात्रा करावी. विचारांत आणि आचारांत माणसाच्या हितासाठीं नवें जितकें उत्पन्न झालें आहे, तितकें स्वतंत्र बुद्धीचें आणि विक्षिप्तपणाचें फळ आहे. स्वातंत्र्याला उत्पन्न करितां येतें, अभिमानाला राखितां येतें. दुराग्रहाला बुडविल्याखेरीज कांहींच साधत

नाहीं. यास्तव दुराग्रहानें मनें जखडून घेऊं नका; त्यांत नवेपणा, ताजेपणा आणि स्वतंत्रपणा सतत राहूं द्या, सूर्यकमळ जसें दिवसभर सूर्याकडे तोंड करून त्याच्या प्रकाशानें प्रसन्न असतें, तसेंच तुमचें मन कर्तव्याच्या व्यायामानें आणि आशेच्या तेजानें सतेज राहूं द्या. मनाच्या मर्यादेपर्यंत त्याचा विकास व्हावा आणि त्याचें सारें सत्व जन्मभर जागृत राहून आयुष्यांतील सर्व उद्योगांत प्रगट होत असावें. हव्या त्या कामाला तयार असावें. ऋतुपरत्वें पोषाख, स्थिति परत्वें आचरण, कालपरत्वें नीति आणि अनुभवपरत्वें इच्छा पालटत जावी. हितकर गुण ज्यांत दिसेल तें सगळें करण्यासारखें आहे, असें समजावें आणि जें स्वच्छ आणि उपयुक्त आहे तें सगळें सोवळें मानावें. भोळेपणानें भलतेच भेद उत्पन्न करून भांबावून जाऊं नका. उपयुक्ततेच्या कसाला जें उतरेल तेंच घ्यावें, आणि परिस्थितीला धरून राहून तिजवर सरशी करण्याची इच्छा धरावी. पहा, आणि विचार करा, विचाराला अनुसरून आचार ठेवा, आणि अक्कल गहाण ठेवून दासपण पत्करूं नका.

ठराव २९. ब्रह्मचर्य, ब्रह्मचर्य; ब्रह्मचर्यव्रतासारखें दुसरें पुरुषार्थदायक शारीरिक व्रत नाहीं. या व्रताचें माहात्म्य सांगूं जाणें ह्मणजे तें कमी करण्यासारखेंच होय; कारण शब्दांनीं तें पुरतें व्यक्त होणें अशक्य आहे. वयाच्या पंचविसाव्या वर्षापर्यंत प्रत्येक स्त्रीपुरुषानें मोठ्या उल्हासानें ब्रह्मचर्य पाळावें; पुढें कोणी आमरण व्रतस्थ राहिल्यास हरकत नाहीं; परंतु पूर्वी मात्र व्रताचा भंग कधींही होऊं नये. एकपत्नीव्रत आणि उपभोगाविषयीं नियमितपणा राखिल्यानें ब्रह्मचर्यव्रताचें श्रेय प्राप्त होतें आणि मनुष्य-स्वभावाच्या व राष्ट्रीय परिस्थितीच्या दृष्टीनें पहातां माणसानें विवाह करावा हेंच त्यास उचित व सुखावह आहे. शरीराची आणि मनाची वाढ पूर्ण होईपर्यंत, आयुष्याची दिशा सांपडेपर्यंत, शिक्षण समाप्त होईपर्यंत, या सर्व गोष्टी उत्तम रीतीनें साधाव्या येवढ्याकरितां आणि पुढील उद्योगांत यश मिळविण्याकरितां, प्रत्येकानें संतोषानें ब्रह्मचर्य पत्करावें. नंतर, झालेला अभ्यास अनुभवांशीं पडताळून पाहण्याकरितां थोडासा प्रवास करावा. आणि त्यांत आपली सखी शोधून सुमुहूर्तावर संसारास आरंभ करावा. उत्कृष्ट मनाप्रमाणें

उत्कृष्ट शरीर ही मोठी देणगी अथवा मोठी कमाई आहे, आणि पुढील आयुष्यांतील सर्व सुख आणि सर्व पराक्रम तिजवर अवलंबून आहे. आयुष्य, आरोग्य आणि ऐश्वर्य यांना देणारें, सहनशक्ति वाढविणारें आणि प्राणाचें पोषण करणारें, असें हें व्रत आहे. पहिल्या पंचविशींत ज्या प्रकारचा जसा भक्कम पाया घालाल, तशी मोठी इमारत त्यावर पुढें तुह्मास उठवितां येणार आहे. या वेळीं व या कामीं उपेक्षा झाल्यास पुढें हजार व्रतांनींही ती सुधरतां येणार नाहीं. तुह्मी सदृढ राहिल्यावांचून राष्ट्र कदापि जगावयाचें आणि वाढावयाचें नाहीं आणि हीं दोन्हीं कामें तुमच्या नांवाला आणि शहाणपणाला शोभण्यासारख्या रीतीनें करणें हेंच तुमचें मुख्य कर्तव्य आहे. अंगांत कुवत पाहिजे. तें मुख्य भांडवल आहे. त्याच्या अभावीं कांहींच नाहीं, इतकेंच नाहीं तर, सर्व दुःखमय आहे. ब्रह्मचर्याची उपेक्षा करून अनाचारानें अथवा अत्याचारानें आपल्या हातानें आपलें आयुष्य छेदून घेऊं नये. वीर्य शक्ति आहे, वीर्य प्राण आहे, वीर्य तेज आहे, वीर्य आयुष्य आहे, आणि वीर्यच पराक्रम आहे. तेव्हां अनपाय-कारक रीतीनें आणि शहाणपणानें आणि सर्व प्रयत्नानें वीर्याचें रक्षण करावें. वीर्याच्या अभावीं संकटाचें आणि दुःखाचें दर्शनही दुःसह वाटेल; निग्रहाच्या आणि नेटाच्या कार्याला निरुपयोगी व्हाल; आणि साहसाची नुसती कल्पनाही तुह्मास मूर्च्छित करील. वीर्यहीन झाल्यावर शस्त्र नुसतें दृष्टीस पडलें तरी भयभीत व्हाल, आणि वीर्यवान् असल्यास शस्त्रें अंगांतून शिरून गेलीं तरी समजणार नाहीं. संसाराच्या, ज्ञानाच्या, शोधाच्या, पराक्रमाच्या व सुखाच्या सर्व कामांत सहनशक्तीची आणि सामर्थ्याची अवश्यकता आहे. हीं कामें सजीव आहेत, तोंपर्यंत तुह्मांस करावयाचीं आहेत, आणि या कामाकरितां तुह्मांस सजीव रहावयाचें आहे. शरीर सदृढ असलें ह्मणजे प्राणशक्तीला भरती येते. प्राणशक्ति भरपूर असली ह्मणजे मनाचें तेज प्रगट होतें, आणि मनस्तत्वाच्या उत्कर्षाबरोबर यश, इष्ट, ज्ञान, आनंद, सिद्धि, आणि कैवल्य, यथावकाश प्राप्त होतात. ज्याची त्यानें आपल्या निर्वाहाची सोय केल्यावांचून विवाह करूंच नये. मोठमोठीं राजकीय आणि सामाजिक कार्यें पार पाडण्यास व्रतस्थ

तरुणांच्या साहाय्याचीच विशेष जरूर लागते व त्यांच्या शक्तीच्या, आवेशाच्या आणि उल्हासाच्या मदतीनेंच तीं सर्वत्र तडीस गेलीं आहेत, व जात आहेत. अल्पवयांत संसाराच्या खोड्यांत सर्वांनीं सारखें पाय अडकाऊन घेतल्यानंतर, आणि एका जीवासभोंवती आणखी मायेचे चार कोंवळें जीव लपेटून घेतल्यावर साहसाच्या कामांत सरसाऊन उडी घालणारे, बेफाम-पणानें कठीण प्रसंगाहूनही कठीण होऊन त्यावर तुटून पडणारे व ज्वालामुखी पर्वताच्या विवरांत शिर हातीं घेऊन शिरणारे पाशरहित, पराक्रमी, तुफान, तरुणबांड, कोठें सांपडतील? संसारांत सहनशक्तीची पदोपदीं गरज लागते. तिजवांचून संकटाशीं, विपत्तीशीं, आणि दुःखाशीं, झगडून त्यांवर विजय मिळविण्याचें कामीं तुह्मांस समर्थ कोण करील? सोन्याच्या संपत्तीपेक्षां देखील व्यक्तिहिताच्या आणि देश-हिताच्या कामीं ही संपत्ति अधिक मोलाची आहे; ह्मणून भाग्याची इच्छा करणाऱ्या समाजानें तिच्यावर कर बसला नाहीं, तोंपर्यंत ती वाढवून घ्यावी, आणि सतत कायम राहील अशी वहिवाट घालून ठेवावी. सारेच कैदी बनल्यास कोणी कोणास सोडवावें? सारेच रोगी झाल्यास कोणी कोणास बरें करावें? व्रतस्थ तरुणांच्या अंगांत जी रग असते, आणि जो उल्हास असतो, तितकी रग आणि तेवढा उल्हास प्रत्येक स्त्रीपुरुषाचें अंगीं आमरण कायम राहील असें त्याचें अथवा तिचें शुद्ध, प्रामाणिक, उद्योगशील, आणि नियमित, वर्तन असावें. ज्ञान आणि सामर्थ्य यांचा संयोग व्यक्ति मात्रांत आणि समाजांत सारखा असला पाहिजे. एका वांचून दुसऱ्याची शोभा नाहीं. जेथें शक्तीची विशेष सांठवण व्रतस्थ तरुणापाशीं असेल, आणि ते तरुण सुज्ञांच्या अधीन असतील, तेथें ऐश्वर्य नांदत राहील. ज्ञानामुळें प्राप्त होणाऱ्या प्रौढपणाशीं आणि अनुभवामुळें प्राप्त होणाऱ्या स्थिरपणाशीं तारुण्यांतील शक्तीचा आणि उत्साहाचा विरोध नाहीं, इतकेंच नव्हे, तर परस्परांस एकमेकांपासून साहाय्य होतें, आणि सर्वांचीं कामें चांगलीं आणि व्यवस्थेशीर होऊं लागतात.

ठराव ३०. सर्व शास्त्रांचीं मूलतत्वें एकत्र करून, योग्याच्या स्फूर्तिरूप मुशींत घालून, आटऊन, त्यांतून अनेक प्रकाराच्या योग्यतेच्या मनुष्यांचें

अनेक बाजूंनीं हित साधण्याकरितां त्यांच्या स्वभावाविषयीं, कर्तव्याविषयीं सुखाविषयीं आणि उन्नतीविषयीं जे सिद्धांत निर्माण होतात, त्यांचा ज्यांत समावेश केलेला असतो तें धर्मशास्त्र होय. जीवाची उत्क्रांति हा त्याचा विषय होय आणि सर्व सचेतन आणि अचेतन वस्तु त्यांतील पदार्थ होत. सृष्टींत ईश्वरतत्वाचें व्याकरण होत आहे; ह्मणजे ज्ञान, बल अधिकार, आणि आनंद, यांचा उत्कर्ष होत आहे आणि सर्व जग एका विशिष्ट दिशेनें अनेक स्थित्यंतरांतून, अनेक अनुभवांतून योग्यतेनें वाढत वाढत उत्तम स्थितीकडे सावकाश जात आहे. जगत् महत्तत्वांतच उत्पन्न झालें आहे आणि त्यांतच तें वर्तत आहे. उभयतांना जो अभेद-रूपानें पाहील तोच डोळस आहे. ब्रह्मांडमंडल प्रभूचें दिव्य मंदिर होय आणि यच्चयावत् लहानथोर, जड अजड, सज्ञान अज्ञान आणि पातकी व पुण्यवान् एकाच मंदिरांत वास्तव्य करीत आहेत; स्वस्वभावा-नुरूप कर्मे आचरीत आहेत; कर्मानुसार स्वभावगुण वाढवीत आहेत; आणि आपापल्या अधिकारानुरूप प्रभुसेवनांत निमग्न आहेत. विश्वांतील प्रकाशापासून प्राणिमात्र तेजाचें शोषण करीत आहेत, शक्तीपासून सामर्थ्याचें आकर्षण करीत आहेत, गुणापासून गुण घेत आहेत, ज्ञानांतून ज्ञान काढीत आहेत आणि आनंदामुळें आनंदित होत आहेत. सर्व आपल्या उद्योगांत निमग्न आहेत आणि पुढें चालले आहेत. विरुद्ध, विषारी आणि अपायकारक प्रकारही येथें आहेत; परंतु त्यांच्या अस्ति-त्वामुळें माणसाचें सामर्थ्य वाढत आहे आणि त्या सामर्थ्याच्या वाढींतच वरील अनिष्ट प्रकारांच्या नाशाची आणि सुखसामुग्रीची तयारी होत आहे. ही प्रगति अथवा सुगति हेंच धर्माचरण होय. आणि धर्मानु-सार आचरण हेंच प्रगतीचें चालक तत्व होय. त्यांत जी दुर्गति आणि विनाश अनुभवास येतात तीं अधर्माचरणाचीं कार्यें होत यांत संशय नाहीं. पण हा अधर्म, अज्ञान आणि असंयमनापासून घडत असल्या-मुळें, परिणामीच्या दुःखांत त्याची परिसमाप्ति होऊन स्वभावांत सुधारणा होत असल्यामुळें, प्रगतीच्या अथवा धर्माच्या हितकर चालक तत्वाशीं, व्यापकदृष्टीनें पाहतां, त्यांचा विरोध होऊं शकत नाहीं. अनेकविध पदार्थ, विचित्र शक्ति, अगाध स्वभाव, अतर्क्य अंतःकरण, विस्तीर्ण

भाषा आणि व्यापक विचार, यांनीं विलसलेलें विश्व हाच पवित्र धर्मग्रंथ होय. या प्रचंड ग्रंथाचें गुरूच्या उपदेशानुसार आस्थापूर्वक परिशीलन करून, कर्तव्यसाधनद्वारें ज्ञान, सत्य आणि सत्ता यांच्या सिद्धीकरितां यथाशक्ति प्रयत्न करणें हीच उपासना होय. मी देवळांत आहे असें मानण्याबरोबर सारेच देवळांत आहेत; स्वहिताची इच्छा धरून अनुभवाच्या वाटेनें डोळे उघडून जे सृष्टींत यथाशक्ति आणि यथामति वापरत असतील, ते सर्व परम धार्मिक होत. माणसानें देवाचें देऊळ बांधणें ह्मणजे त्याचा मोठेपणा कमी करण्यासारखें आहे. परंतु उपासनेच्या केवळ समंजस उद्देशानें पवित्रस्थानें निर्माण करणें हितावह आहे. प्रभूच्या विस्तीर्ण विश्वमंदिराचें द्वार सर्वांना सर्व काळीं मोकळें आहे. तेथें जाऊन नानाप्रकारच्या दर्शनीय चमत्कारांचें दर्शन घ्यावें, बुद्धीचें कौशल्य, शक्तींचें सामर्थ्य आणि आत्म्याचे विलास पहावे आणि आपलें ज्ञान, अनुभव, सामर्थ्य, आणि सुख वाढवून घेऊन कर्तव्याची सीमा करावी. तेथें कोणा उपाध्यायाचा, भिक्षुकाचा अथवा गुरवाचा पाहरा नाहीं, विटाळ नाहीं, जकात नाहीं, जात नाहीं, काळ नाहीं, वय नाहीं. सृष्टीचीं आणि स्वभावाचीं रमणीय रूपें पाहून तुमचें चित्त प्रसन्न आणि प्रौढ होईल, पदार्थ आणि मन यांनीं व्यापिलेल्या विश्वाचा विस्तार पाहून अंतःकरण विस्तीर्ण होईल, व नानाविध शक्तींचे चमत्कार पाहून विस्मयानें तुमचें चित्त उदात्त आणि सबल होईल. या मंदिरांत सिद्धीच्या मानानें सर्व देव आहेत आणि आशेच्या मानानें सर्व उपासक आहेत. येथें सर्वच अपौरुषेय आहे, सर्वच ईश्वरी आहे आणि त्या ईशचैतन्याला वश होऊन सर्व त्याच्याच वाटेनें जात आहेत प्रभूच्या आज्ञांनीं हा पवित्र ग्रंथ ओतप्रोत भरलेला आहे. परमेश्वर जगताचा आदिगुरु आहे आणि सारे जीव त्याचे शिष्य आहेत. माणसानें आपल्या अभिमानाला अथवा समर्याद ज्ञानाला वश होऊन परमेश्वराच्या उपदेशाला अथवा प्रचंड ज्ञानाला मर्यादा घालणें हें त्याचें वेडेपण होय. परंतु त्या मर्यादा ह्मणजे नाना मतें आणि नाना धर्म आणि हें वेडेपणसुद्धां ईश्वरी विश्वविस्तारांतील ईश्वरी योजनेचींच अंगें होत, आणि ह्मणूनच तीं त्यांत दिसत आहेत. पूर्ण आणि यथार्थ

ज्ञान झाल्यानंतर तीं सर्व लयास जातील आणि तोंवर तें प्राप्त करून देण्यासाठींच तीं उत्पन्न होतील. व्यावहारिक धर्मशास्त्र, मनुष्यकृत ह्मणजे ईश्वरी ज्ञानाच्या अंशानें युक्त असल्यामुळें नेहमीं कालानें आणि देशानें परिच्छिन्न असतें व तसें तें आहे असें मानणें हेंच शहाणपण होय. वाढत्या अनुभवाच्या आणि ज्ञानाच्या मानानें त्यांत फेरबदल होतील आणि योग्यतेच्या मानानें निरनिराळ्या समाजास निरनिराळीं धर्मशास्त्रें लागतील. धर्मशास्त्राच्या आवश्यकतेविषयीं शंका नाहीं. कारण, विशिष्ट आचरणानें वागून अभीष्ट संपादन करावें असा प्राणिमात्राचा स्वभाव आहे आणि त्या विशेष आचरणाचे भिन्न नियम भिन्न प्रकारच्या माणसांस जो शिकवितो, तो त्याचा धर्म. गूढ प्रश्नांचीं परम गूढ उत्तरें कोणास कशींही सांपडलीं तरी त्यामुळें आचरणांत व्यत्यय येत नाहीं. धर्माच्या, स्वभावाच्या आणि कर्तव्याच्या मूल तत्वाविषयींही बहुतेक एक मतच आहे. भेद काय ते देश, काल, आणि अधिकार यांच्या अनुरोधानें उत्पन्न होतात आणि त्यामुळें आचरणाच्या नियमांत फेरबदल होतात व करावे लागतात. मूलतत्वाशीं ते फरक विरुद्ध नसतात आणि ह्मणून इष्ट स्थितीला नेऊन पोंचविणारे असतात. त्यांतून आपल्या अभिरुचीला आणि हिताच्या कल्पनेला अनुसरून जें असेल त्यांस प्रत्येकानें अनुसरावें आणि आग्रहपूर्वक त्यांतील तत्वांवर विश्वास ठेऊन चालत असतांना स्वतंत्र विचारास सवड आणि अनुभवाच्या वाढीस पैस राखून ठेविला पाहिजे. त्यांत राहून इष्टाचरणास प्रतिबंध होऊं नये आणि इष्टाचरणामुळें सुधारणेस प्रतिबंध होऊं नये. धर्म, कालाच्या समजुतीस आणि स्वभावाच्या धर्मास अनुरूप, असला पाहिजे इतकेंच नव्हे, तर ती समजूत वाढविण्याचा आणि तो स्वभाव सुधारण्याचा त्यांत गुणही असला पाहिजे. अंगच्या गुणाला रुचणारा आणि सामर्थ्याला साधणारा तो असावा ; तसाच गुण आणि सामर्थ्य वाढविणाराही असावा. तुह्मांस न समजेल आणि न रुचेल असें धर्मशास्त्र बृहस्पतीनें जरी कृपाळू होऊन तुह्मांस दिलें तरी तें तुह्मांस नको. कारण जें तुह्मांस उमजत नाहीं तें साधण्याच्या जर तुह्मीं नादीं लागला तर समजुतीच्या बाहेर

असल्यामुळें तें तर हातचें गेलेलेंच आहे, परंतु जें तुमच्या अधिकारानुरूप साध्य होण्यासारखें आहे त्याचा स्वीकार न केल्यामुळें त्यालाही मुकाल. ज्यांतील तत्वांची उपयुक्तता तुह्मांस कळेल व जें तुमच्या व्यवहारास अनुसरून असून तुमच्या समजुतीप्रमाणें इष्ट लाभ देऊन त्यांत सुधारणा करणारें असेल, तेंच तुमचें धर्मशास्त्र. ज्यांतील तत्वांच्या उत्कृष्टपणाविषयीं आणि सत्यतेविषयीं तुमची पूर्ण खात्री असेल, ज्याचा बोध करणाऱ्या आचार्यांविषयीं तुमच्या मनांत अतिशय पूज्यबुद्धि वसत असेल, ज्यांत उपदेशिलेल्या मताला आणि कर्माला अनुसरण्याविषयीं तुह्मांस मोठा उल्हास वाटेल आणि सर्वांपेक्षां ज्यापासून तुमचें अधिक कल्याण होईल असा तुमचा विश्वास असेल, तेंच तुमचें धर्मशास्त्र व तेंच तुह्मीं घ्यावें. अत्युत्तम, अत्युत्तम, अशा ज्ञानाच्या, स्वभावाच्या, आणि कर्तव्याच्या कल्पना तुह्मांपाशीं असाव्या आणि त्याप्रमाणें होण्याविषयीं तुमचा दृढ निश्चय असावा. तथापि अकलेच्या आटोक्यांत आहांत तोंपर्यंत तुह्मीं सजीव आहां; पलीकडे गेला ह्मणजे काष्ठांत आणि तुह्मांत अंतर नाहीं. शहाण्यांनीं शहाणें ह्मणावें ह्मणून, त्यांच्या शब्दाचा पोकळ प्रतिध्वनि केल्यानें खरें शहाणपण येत नाहीं. तें आंतून जितकें उत्पन्न होईल, तेवढेंच तुमचें व तेवढ्यावरच तुह्मीं निर्वाह केल्यास तें तुमच्या अंगीं लागेल; परंतु ज्याच्या चांगुलपणाविषयीं तुमची पूर्ण खात्री होत नाहीं; तथापि जें चांगलें असावें असें तुह्मांस भासतें व तें चांगलें आहे असें प्रतिपादन करणारीं माणसें थोर आहेत असें तुह्मांस वाटतें, अशा गोष्टींचे उत्कृष्टत्व नीट प्रतीतीस न आलें, अथवा दुर्बलतेमुळें त्याप्रमाणें आचरण घडत नसलें, तरी त्यांवर विश्वास ठेवणें अयोग्य होणार नाहीं. माया आणि ब्रह्म, विश्व आणि आत्मा, ईश्वर आणि प्रारब्ध, यांविषयीं नम्रभावानें विचार करा; परंतु एका अज्ञात वस्तूचा उलगडा दुसऱ्या एका तितक्याच अज्ञात वस्तूच्या साहाय्यानें करूं नये, अथवा आपल्या बुद्धीहून मोठ्या वस्तूस बुद्धीच्या आटोक्यांत आणून लहान ठरवूं नये. आज न समजलेलें उद्यां समजेल. तुह्मांकरितां सर्व आहे, आणि सर्वांकरितां तुह्मीं आहां. तुह्मीं शहाणे झाल्या

नंतर प्रभूच्या प्रचंड दौलतीचे तुह्मांसच वारस करावयाचें आहे हें तुमच्या वाढत्या ज्ञानाच्या मानानें तुमचें जें ऐश्वर्य क्रमाक्रमानें वाढत आहे, त्यावरून तुमच्या ध्यानांत येईल. धर्मांत आणि परमार्थांत देखील देशहितासह स्वहित पहावें, अथवा आत्महित आणि देशहित साधून देण्याचा धर्मांत गुण असावा. सुस्थितींतील माणसांना सुखानें जेवावयाला सांपडावें ह्मणून, गरीबाला अधिक गरीब करणारें धर्माचें आणि नीतीचें शिक्षण उदारपणें देण्याची बरीच काळजी घेण्यांत येते. आस्थेवाईक धर्मोपदेश कळकळीनें काम करितात खरें; परंतु त्याचा फायदा तिसरेच हरीप करून घेतात. तेव्हां ज्या धर्मामुळें अथवा नीतीनें गरीब गरीब राहील, अथवा पापी पतित होईल, तो धर्म अधर्म होय आणि ती नीति अनीति होय. साऱ्या व्यक्तींचें जेणेंकरून क्रमाक्रमानें सारखें हित होईल, समाजांतील अन्याय, विपत्ति आणि अज्ञान जेणेंकरून नाहींसें होईल, आणि देश जेणेंकरून सुखी, संपन्न,आणि स्वतंत्र होईल आणि राहील, तोच खरा धर्म, आणि तोच तुह्मांस पाहिजे. धर्माचें तत्व गुहेंत नेऊन ठेविलेलें नाहीं; सूर्याच्या अखंड प्रकाशांत तें प्रकट आहे. ज्याला जितकें लागेल तितकें त्यानें घ्यावें आणि आपल्या आयुष्याचें सार्थक करावें. उगाच गूढागूढांत शिरून भ्रमाच्या जालांत गढून जऊं नये. सामर्थ्या बाहेरील गूढ उकलण्याच्या भरीस पडून जवळच्या रोकड्या कर्तव्यास अंतरूं नये, आणि आपल्या हातानें आपला उपहास आणि नाश करून घेऊं नये. व्यवहाराशीं धर्माचें वैर नाहीं, इतकेंच नव्हे तर व्यवहार उत्तम रीतीनें जो साधून देईल, प्रगतीस जो साहाय्य करील व सर्व कालीं, सर्व प्रसंगीं काळासारखा आणि प्रसंगासारखा होऊन, काळ आणि प्रसंग यांवर सरशी करवील आणि माणसास अभीष्ट देऊन जो सुखी, सज्ञान, सत्ताधीश करील तोच खरा धर्म. बाकी जो व्यवहाराच्या कसाला उतरणार नाहीं, तो अधर्म--व्यवहार. सिद्धीसाठीं धर्म आणि प्रभुप्राप्तीसाठीं व्यवहार अथवा प्रपंच आहे. मत्स्याला जसें जल, तसेंच माणसाला प्रपंच. विश्व हें विश्वात्म्या प्रभूचें राज्य होय; दुर्बल माणसाची दुर्दशा करण्यासाठीं पसरलेलें मोहजाल नव्हे. विश्व सत्य आहे; मायिक नव्हे. ईश्वराचें सत्यत्व त्यामुळेंच

साधिलें जातें. येथें दुःख, दैन्य, अज्ञान, आणि मरण आहे ह्मणून प्रभूला जगत् अप्रिय आहे आणि प्रभु न्यायप्रिय नाहीं असें सिद्ध होत नाहीं. न्याय, करुणा आणि प्रेम जगांत ओतप्रोत भरलेलीं आहेत, आणि येथील सारा कारभार आधीं जातीची आणि नंतर व्यक्तीची केवळ उन्नतीच साधून देणारा आहे. सारे प्रतिकूल प्रकार शेवटीं अनुकूल कार्य घडवून आणीत आहेत आणि प्रभूचें कृपालुत्व व्यक्त करणारी मरणा इतकी श्रेष्ठ दुसरी ख्रैष्टिक संस्था नाहीं. प्रयत्नांतीं सुख, ज्ञान, इत्यादि इष्ट फलें प्राप्तव्हावीं अशी पदार्थांची, शक्तीची आणि बुद्धीची विपुलसाधनें जीवाच्या हाताशीं ठेविलीं आहेत. अभ्यासाचें व अनुभवाचे संस्कार मनावर घडत आहेत. आणि भावी उपयोगासाठीं ते तेथें कायम रहात आहेत. चुकलेलें दुरुस्त करितां येत आहे आणि बिघडलेलें सुधारतां येत आहे, यामुळें माणसाला उद्धाराची मोठी आशा आहे. ज्ञान, बल आणि आनंद यांचा उत्कर्ष होत आहे आणि जेथें अज्ञानामुळें अथवा आळसामुळें अन्यथा आचरण घडत आहे, तेथें दोष आणि दुःख यांच्या द्वारानें माणसास वाटेवर आणण्यांत येत आहे. संकटांतून सामर्थ्य, दुःखांतून सुख, दोषांतून गुण, चुकींतून सत्य, आणि मरणांतून अमरत्व, उदय पावत आहे. योग्यता वाढत आहे; प्रगति होत आहे; आणि माणसाच्या सुदैवानें त्याच्या इतिहासांत एक काळ असा येईल कीं, जेव्हां त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतील, ज्ञान होईल, बल येईल, आणि उत्तम पदवी प्राप्त होईल. जगतांत अन्यायमूलक उच्चनीच भाव नाहीं. अधिकारानुरूप प्रयत्न आणि प्रयत्नानुरूप सिद्धि होत आहे. जेथें यश कमी, तेथें योग्यताही कमी असते, आणि आणि योग्यतेंत कमीपणा असल्यावर यशाची प्राप्ति न व्हावी, यांतच व्यक्तीचें हित आहे. सृष्टीची अप्रतिम शोभा, गुणाची गोडी, बुद्धीचा प्रकाश, काव्याचा रस, शास्त्रांचे चमत्कार, कलेचा थाट, कर्तव्याचें समाधान, आणि स्वभावाचें सुख, हीं सारीं रावापासून रंकापर्यंत सर्वांस मोकळीं आहेत. सर्व आपआपल्या समजुतीप्रमाणें सुखाच्याच वाटेनें जात आहेत. समजुतींत फरक असल्यामुळें चुका होत आहेत, चुकीमुळें दुःख होत आहे. आणि त्या दुःखापासूनच चुकलें कोठें आणि

बरोबर कोणतें, याचा उलगडा होत आहे. येथें मन:पूत आचरणाला जितकी मुभा आहे, तितकीच उपदेशाला आणि निंदेलाही आहे, आणि असली पाहिजे. प्रकृतिधर्माला अनुसरून प्राणिमात्र वर्तत असल्यामुळें कोणी पापी, अधम अथवा अपराधी ठरत नाहीं, आणि ह्मणून सामाजिक सुस्थितीला जेव्हां एखाद्याचें वर्तन बाधक होतें, तेव्हां समाजाकडून व्यक्तीला जी शिक्षा देण्यांत येते व आली पाहिजे ती शिक्षा शिक्षणरूप होय, व तशा भावनेनेंच दयालु न्यायाधीशांनीं व्यक्तीच्या सुधारणेसाठीं ती दिली पाहिजे. ईश्वराला स्मरून, मनाला अनुसरून, आणि सद्गुरूला धरून प्रामाणिकपणानें जें जें कर्म करण्यांत येतें, त्यांत न कळत पाप घडल्यास त्याचा दोष माणसाकडे येत नाहीं, व आल्यास प्रभु त्याबद्दल त्याला क्षमा करील. बाधक मनोवृत्तींचें बंड मोडून बुद्धीचा उदय होत आहे, आणि बुद्धीच्या उत्कर्षाबरोबरच माणसाचें स्वातंत्र्य आणि तेज वाढत आहे. तसेंच प्रेमतत्वाच्या उत्कर्षाबरोबर माणसाचें माणूसपण, त्यांचें सुख व त्याच्या आप्तपणाचीही व्याप्ति वाढत आहे. मनुष्य आपल्या कर्माचा स्वामी आणि यशाचा शास्ता आहे. बुद्धीच्या अनुशासनाखालीं त्याचें राज्य वाढत आहे, आणि कर्मसामग्री सज्ज होत आहे, आणि ज्ञान व कर्म यांना अनुसरून त्याच्या स्वभावाचें तेज खुलत आहे. प्रेरक बुद्धि आणि कारक कर्म यांच्या आश्रयानेंच त्याचा उद्धार होईल. ही दोन प्रमुख साधनें होत; त्यांचा कदापि अनादर होऊं नये. ज्ञान आणि कर्म, प्रयत्न अथवा अभ्यास यांवर विश्वास ठेवून चालल्यास सुखाची आणि ऐश्वर्याची तूट पडणार नाहीं; कारण त्यांना अशक्य आणि असाध्य असें त्रैलोक्यांत कांहीं नाहीं. कशावर तरी नुसता विश्वास ठेवून भागणार नाहीं. पोकळ विश्वास फलप्रद होत नाहीं; ज्ञानाचा हात धरून विश्वासानें चाललें पाहिजे. स्वप्नसृष्टींतील कल्पवृक्षाच्या सावलींत बसून कोणीही कृतार्थ झाला नाहीं. स्वर्गावर विश्वास ठेवून स्वर्गप्राप्ति, आणि मोक्षावर विश्वास ठेवून मोक्षप्राप्ति होणार नाहीं. मुख्य तारक कर्म ज्ञानानुसार केलेलें कर्म होय. आणि सर्व कर्मांचें, सद्गुणाचें आणि उपासनेचें इष्ट फल ज्ञान होय, आणि ज्ञानाचें पर्यवसान आत्मसिद्धि होय. कर्मावर दृढ विश्वास असूं द्या आणि देवाचें

नांव घेऊन जी उत्तमोत्तम स्थिति पाहिजे असेल ती जातीनें यत्न करून यथावकाश संपादन करा, आणि आपल्या गुणाची आणि सामर्थ्याची पराकाष्ठा करून कर्तव्यऋणांतून मोकळे व्हा. ज्ञानाचा प्रभाव आणि कर्माचा पराक्रम फार प्रचंड आहे; त्यांचा अंत लावीपर्यंत तुमचें कर्तव्य संपत नाहीं, ह्मणून तोंपर्यंत विश्रांति घेऊं नका. उपासनेचा प्रभावही सामान्य नाहीं. परंतु उपासना हें मानसिक कर्म असल्यामुळें, सामान्यत्वें करून कर्मांतच त्याचा अंतर्भाव होतो. मनाची उन्नति हाच उपासना आणि कर्म या दोहोंचा उद्देश. तो उद्देश स्वाश्रयभूत करून, अंत:करण साधीत असतें, तेव्हां उपासना ह्मणतात, आणि इंद्रियांचा आश्रय धरून साधीत असतांना त्यास कर्म ह्मणतात. तेव्हां अधिकारानुरूप कोणताही मार्ग स्वीकारा आणि मानसिक उन्नति आणि शक्तिस्फुरणरूप अभीष्ट फल प्राप्त करून घ्या. आणि प्राणिमात्रावर प्रेम करा. त्यांत अगोदर आपल्या देशबांधवांवर अत्यंत ममत्व राहूं द्या, आणि त्यांचें सर्व बाजूंनीं कल्याण होईल, अशी इच्छा आणि प्रयत्न असूं द्या, आणि नंतर सर्व जगताच्या उद्धाराचा संकल्प करा. सर्वांना ज्यांपासून सुख होईल, ज्यांपासून सर्वांचें इष्टकार्य तडीस जाईल, आणि योग्यतेचा उत्कर्ष होऊन सर्वांस इष्टफलाचा लाभ होईल, असले सद्‌गुण संपादन करा, आणि प्रयत्नाला असाध्य कांहींच नाहीं, यावर विश्वास ठेवून मोठ्या निश्चयानें, उल्हासानें आणि शहाणपणानें कर्तव्याची सीमा करा आणि कृतकृत्य व्हा. निरोग काया, पूर्णायुष्य, प्रेमल आप्तमित्र, कर्तव्यशील पुत्र, अपार सुख, अनुपम शांति, अत्युत्तम स्वभाव, स्वर्गीय ऐश्वर्य, पूर्ण ज्ञान, यशस्वी पराक्रम, अमूल्य स्वातंत्र्य, प्रचंड सत्ता, हीं व्यक्तीसह राष्ट्रांस आणि राष्ट्रांसह जगतास ज्या उपायानीं अनुकूल होतील आणि टिकून राहतील अशीं तत्वें जो तुमच्या स्वाधीन करील तोच तुमचा खरा धर्म होय. तो तुह्मी गुरूच्या आशीर्वादानें आणि स्वत:च्या विचारानें समजून घ्यावा, आणि अभिमानपूर्वक, प्राणाप्रमाणें त्यास प्रिय मानून स्वत:चें ऐहिक आणि पारमार्थिक हित तुह्मी आर्यांनीं नांवाप्रमाणें साधून घ्यावें.

ठराव ३१. आवडीच्या व्यवसायांत, सुखाच्या साधनांत आणि उपजीविकेच्या खटाटोपांत, सारीं माणसें चूर असतांना व आपापल्या संकुचित क्षेत्रांत आपलें कर्तव्य बजावीत असतांना, एकंदर समाजाच्या कल्याणाविषयीं व्यापक दृष्टीनें विचार करण्याकरितां, उपदेशानें आणि उदाहरणानें देशहितीं आणि आत्महितीं सर्वांस निरपेक्ष बुद्धीनें निरंतर सावध ठेवण्याकरितां आणि उन्नतीची आणि उत्कर्षाची वाट सर्वांस दाखविण्याकरितां आचार्यांचा स्वतंत्र वर्ग पाहिजे. ज्ञानसंग्रह आणि लोककल्याण अथवा अध्ययन आणि अध्यापन हेंच त्याचें काम. संताच्या विभूती जगाच्या कल्यासासाठीं मधून मधून उत्पन्न होतात; परंतु धूमकेतूच्या अनियमित उदयास्ताप्रमाणें त्यांचें येणेंजाणें घडतें. ते येतील तेव्हां मोठा लाभ देऊन जातीलच; परंतु नेहमींच्या कामाकरितां कायमची तजवीज होणें जरूर आहे. धीर, उदार आणि सुज्ञ पुरुष समाजांत सर्व कालीं असतात, त्यांपैकीं कांहींनीं हें लोकांचें काम आपलें समजून अंगावर घेतलें पाहिजे. त्यांनीं त्या कार्याला पूर्णपणें आणि वंशपरंपरेनें वाहून घेतलें पाहिजे. देशाचा संसार आपला मानून त्यांनीं चालविला पाहिजे. स्वतःच्या चरितार्थाची, सुखाची अथवा संरक्षणाची मुळीच काळजी न वाहतां, सारें मन देशसेवेंत गुंतविलें पाहिजे. स्वतःला सर्वस्वी विसरून, समाजाच्या जिवांत जीव घालून आणि समाजाएवढें होऊन त्यांनीं जगावें. राजकीय, सामाजिक, शारीरिक, धार्मिक, शिक्षणविषयक, इत्यादि सर्व कामांवर त्यांची देखरेख असावी, आणि त्यांत त्यांनीं पडून त्यांस साहाय्य करावें. शिक्षणाचें आणि धर्माचें काम त्यांनीं विशेषेंकरून हातीं घ्यावें. स्वदेशांत कोणी अशिक्षित आणि अज्ञान राहूं नये. प्रत्येकाच्या योग्यतेप्रमाणें घेतां येईल तितकें ज्ञान आणि सामर्थ्य त्यास मिळालें पाहिजे. हें साधल्यानंतर अथवा साधित असतांना, आपल्या ज्ञानाच्या आणि तपाच्या जोरानें पृथ्वीवरील सारे लोक केवळ भूतदयेस्तव आपल्या काबूंत आणून त्यांसही सज्ञान करून सोडावें. कोठें कोणास अज्ञानांत अथवा झोपेंत राहूं देऊं नये, आणि केवळ परोपकारबुद्धीनें जगांतील अज्ञानाचें निर्मूलन करण्याकरितां जगाला वश करावें आणि त्यांतील अंधेराचा नाश करण्याकरितां आपला

प्रकाश सर्वत्र पसरावा. आपला सारा समाज समंजस झाल्यावांचून मोठालीं कार्यें सिद्धीस नेतां येणार नाहींत. आधींच अजाण असून तशांत काबाडकष्टामुळें ज्यांच्या बुद्धीस अधिक मांद्य आलें आहे, अशा गरीब लोकांची अधिक काळजी घेतली पाहिजे. श्रीमंताची श्रीमंती अभंग रहावी ह्मणून, समुदायानें अज्ञानांत आणि त्यामुळें दास्यांत राहावें अशी इच्छा कोठें कोठें दृष्टीस पडते. तिचें कार्य चार दिवस सुखावह होईल; परंतु अखेरीस भयंकर अनर्थास तेंच कारण होईल ह्मणून त्याचा आरंभापासूनच प्रतीकार केला पाहिजे. विद्येवर सर्वांचा हक्क सारखा आहे, ह्मणून ती सर्वांस घेतां येईल तितकी दिली पाहिजे. समाज समंजस झाल्यास त्यांत मोठी प्रचंड शक्ति उत्पन्न होईल व तोच अडाणी राहिल्यास शहाण्यास बरोबर घेऊन घर बुडवील. शिक्षण आणि अध्यापन हीं सामाजिक कर्तव्यांपैकीं अति पवित्र कर्तव्यें आहेत. त्यांत व्यापार नसावा, ह्मणजे विद्येच्या दरबारांत सर्वांस मुक्तद्वार असावें. कर बसविण्याला अथवा रोजगार करण्याला आणखीं पुष्कळ ठिकाणें आहेत. आचार्याविषयीं लोकांत आदर बुद्धि वसत नाहीं असें दिसतें. आश्चर्यकारक आणि पूज्य असें कोणास कांहींच दिसेनासें झालें आहे हें चांगलें नव्हे. प्राणाहून प्रिय असा मित्र जसा प्रत्येकास पाहिजे, तसाच ज्याविषयीं देवाप्रमाणें आदर बुद्धि वाटावी, असा गुरूही प्रत्येकास आवश्यक आहे. लोक अडदांड आहेत ह्मणून अनादर होऊं लागला, ही गोष्ट खोटी असून पूज्यभाव उत्पन्न व्हावा अशी योग्यता आणि करामत आचार्यांत उरली नाहीं आणि लोभाविष्ट व स्थानभ्रष्ट होऊन इतर वर्णांशीं त्याच्या व्यवसायांत ते स्पर्धा करूं लागले, हेंच त्याचें खरें कारण होय. लोकांच्या दोषांचा पाढा वाचून कोणी आचार्य अथवा नायक आपली लंगडी बाजू सांवरून घेऊं लागल्यास त्याचा हेतु ओळखिल्यावांचून आणि आपलें व्यंग दुसऱ्याचे अंगीं लावण्याबद्दल त्याची अप्रतिष्ठा केल्यावांचून लोक राहणार नाहींत. आचार्यांनीं ममतेनें आणि निर्लोभ लोकसेवेनें लोकांच्या अंत:करणांत घर करून राहिलें पाहिजे अथवा त्यांच्या प्राणास आपल्या अंत:करणांत सांठवून त्यांस आपलेंसें करून घेतलें पाहिजे. तेणेंकरून

आचार्यांविषयीं लोकांच्या मनांत अपरिमित आदर उत्पन्न झाला पाहिजे; आणि दोघांचा एक जीव होऊन दोघांनीं एकमेकांच्या हांकेसरशी उडी घातली पाहिजे. बाल्यावस्थेंत मन मऊ आहे तोंपर्यंत, त्यांवर आचार्यांनीं शिक्षणाचे इष्ट संस्कार केले पाहिजेत कीं, जे पुढें जन्मभर उपयोगीं पडतील. शोधाचें आणि ग्रंथलेखनाचेंही काम आचार्यांचेंच आहे, तें त्यांनीं करावें; परंतु कागदांवर लिहिलेल्या लेखांपेक्षां लोकांच्या हृत्पटावर लिहिलेले लेख चिरकाल टिकून राहतील. ग्रंथ असंख्य पाहिजेत; पण ते या दोन्ही रीतींनीं लिहून ठेवण्याची व्यवस्था व्हावी. खजिन्याच्या संरक्षणाकरितां त्यावर जसा अहर्निश पहारा हवा, त्याप्रमाणेंच समाजहितावर आचार्यांनीं सदोदित खडा पहारा केला पाहिजे. त्यांचेंच काम हें; कारण हें करण्यास पाहिजे असलेली योग्यता त्यांचेच अंगीं आहे. या कर्तव्यांत जो आनंद आहे, तो निरुपम आहे व तो उदार चरित आचार्यांवांचून दुसऱ्या कोणासही कळणार नाहीं. आपला खासगी लहानसा संसार लहानशा बुद्धीनें करीत असतांना, प्रापंचिकाला त्यांत इतकें सुख होतें कीं, त्यापुढें वसिष्ठासारख्या महायोग्याचाही वैराग्याविषयींचा उपदेश तुच्छ वाटतो, तर मग वसिष्ठाचें श्रेयस्कर वैराग्य घेऊन, आणखी समाजाचा थोरला संसार आस्थापूर्वक चालवीत असतांना, बृहत्प्रापंचिक आचार्याला जें सुख होत असेल, तें साधारण व्यक्तीच्या लहानशा कल्पनेच्या आटोक्यांत येणें अशक्य आहे. कोणावर भार न घालितां, निर्वाहाची थोडक्यांत कशी तरी तजवीज करून स्वयंसेवकवृत्तीनें आचार्यांनीं लोककल्याणकार्यीं सर्वकाल दक्ष असावें. उपजीविकेसाठीं कोणावरही अवलंबून राहूं नये, आणि दक्षिणेची अयाचित वृत्तीनेंही अपेक्षा करूं नये. कारण, त्यामुळें अध्यापनाची किंमत ठरून कमी झाल्यासारखें अजाणास वाटूं लागेल. स्वतःचें स्वतंत्र असें आचार्यांस तपाखेरीज कांहींच काम असूं नये. कारण, लोकांच्या कामांत आणि लोकांवरील प्रेमांत त्यामुळें अंतराय येईल. कांहींएक अपाय न होतां माणसाला आजन्म अविवाहित राहतां येते. आचार्यांनीं विवाह केल्यास हरकत नाहीं. त्याचें काम त्यांच्यासारखें पुढें चालविण्याकरितां योग्य कन्यापुत्र त्यांसच निर्माण करितां येतील.

जोंपर्यंत चैतन्याचें चिन्ह पृथ्वीच्या पाठीवर कायम राहील, तोंपर्यंत आचार्यांनीं आपलें काम आस्थेनें आणि दक्षतेनें बजाविलें पाहिजे आणि आपला देश असा कर्तव्यशील, सुखी, सज्ञान, संपन्न, आणि स्वतंत्र करून ठेविला पाहिजे कीं, कालाचा आणि पृथ्वीचा अंत होईपर्यंत त्याच्या व्यवस्थित स्थितींत आणि उत्कर्षांत अंतर पडूं नये. ठिकठिकाणीं समाज आणि संस्था स्थापून आणि माणसें नेमून लोकशिक्षणाच्या व शोधाच्या कामाची व्यवस्था केली पाहिजे. सर्वांस कर्तव्याला जें सर्व प्रकारें योग्य करील असें शिक्षण सर्वांना मुबलक मिळालें पाहिजे. कर्तव्याची प्रशंसा आणि उपदेशाचा गजर अहोरात्र चालू ठेवून आचार्यांनीं लोकांना सतत जागृत ठेविलें पाहिजे. लोकांच्या उन्नतीची सर्व जोखीम आचार्यांवर आहे. ते आपल्या कर्तव्यांत परमार्थ बुद्धीनें दक्ष राहिल्यास त्यांच्या प्रजेवर अप्रतिष्ठेचा अथवा अहिताचा प्रसंग सहसा येणार नाहीं. वासनेचा क्षय होऊन जे तृप्त झाले आहेत, परोपकाराखेरीज ज्यांना स्वत:चें कर्तव्य उरलें नाहीं, सात्विकगुणसंपत्तीचें भांडार ज्यांपाशीं भरलेलें आहे, ज्ञानदृष्टीमुळें सारें जगत् ईशचैतन्यानें ओतप्रोत भरलेलें ज्यांना दिसूं लागलें आहे, भूतदयेमुळें लोकांच्या दु:खानें जे दु:खी आणि सुखानें जे सुखी होत आहेत, ज्यांच्या अपार प्रेमाला सारे स्त्रीपुरुष आपल्याप्रमाणें वाटूं लागले आहेत आणि सारी वसुधा कुटुंबाप्रमाणें वाटूं लागली आहे, परदु:खापासून ज्यांना इतकें दु:ख होतें कीं तें दूर व्हावें ह्मणून स्वत:च्या जीवाचा बळी देण्यासही जे संतोषानें तयार होतात, प्राणिमात्राच्या हिताविषयीं जे अहर्निश झटतात, दुर्बल जनसमुदायाचा मोठा संसार अंगावर घेऊन नीट चालवितां यावा ह्मणून, ज्या समर्थांनीं स्वत:च्या संसारावर तिळांजलि सोडिला, लोकांविषयीं प्रेम दाटून येऊन ज्यांनीं स्वार्थाचा होम केला आणि अंगाला असंगाची राख फांसून वैराग्य घेतलें, ज्ञानाच्या प्रकाशानें जगांतील अविद्येचा अंधकार निर्मूल करण्यास जे समर्थ आहेत, लोकांच्या पातकांच्या राशीला आग लाऊन जाळून टाकण्यापुरता सुकृताचा अग्नि ज्यांच्या अंगांत भडकला आहे, साऱ्या जगाची मुखश्री प्रसन्न करण्यापुरतें तेज ज्यांच्या अंगीं संचरलें आहे; सर्वांना कर्तव्यतत्पर करण्या पुरतें योग-सामर्थ्य ज्यांपाशीं आहे,

आणि विषयजन्य सुखापेक्षां लक्षपटीनें सरस आत्मानंदाचा ज्यांस लाभ झाला आहे, कीं जेणेंकरून जगाचें दैन्य आणि दु:ख ज्यांना सहज दूर करितां येईल, अशा कृपाळू, परम समर्थ, सद्गुरूचा ज्या समाजास लाभ झाला आहे, आणि जे निरंतर त्यांत राहून त्याचें हित साधीत आहेत, त्यांच्या भाग्याचा उत्कर्ष होण्याची शंका कशाला पाहिजे? जन्मांतरीं सर्व भोग भोगिल्यानंतर ज्ञान, तम आणि विज्ञान अथवा साक्षात्कार यांनीं तृप्त होऊन साधकानें प्राप्त करून घ्यावयाची जी उत्तमोत्तम स्थिति **श्रीकृष्ण**परमात्म्यांनीं परम प्रिय **अर्जुना**ला भगवत्-गीतेंत निरूपण केली आहे, तीच होय; आणि सर्वभूतहितीं रत होऊन जें उत्कृष्ट परमार्थरूप कर्तव्य त्यांनीं सांगितलें आहे तें हेंच होय. त्या उपदेशाचा विपरीत अर्थ करून आत्मप्राप्तीच्या उपकारक साधनांचाही ज्यांनीं संगभीतीनें त्याग केला, त्यांनीं आत्मघात करून घेतला. एकांनीं योगाभ्यास समाप्त झाल्यानंतर सुखदु:खाचें कोडें उलगडल्यानंतर, आत्मानात्मविवेक झाल्यानंतर, कार्याकार्याचा निवाडा केल्यानंतर, सत्पुरुषानें आपल्या तपाचें आणि ज्ञानाचें श्रेय आपल्या लोकांपाशीं येऊन त्यास समर्पण केलें पाहिजे: स्वत:ची लहानशी सेवा समाप्त झाल्यानंतर, ह्मणजे यथार्थ ज्ञानप्राप्ति होऊन कृतकार्य आणि अल्पतृप्त झाल्यानंतर, आचार्यांनीं भूतमात्राच्या उद्धाराचें मोठें कार्य शिरावर घेतलें पाहिजे. सारें जगत् सुस्थितीला पोहोंचल्यावांचून त्यांची तपश्चर्या आणि त्यांचें ज्ञान सफल होत नाहीं. आत्मसुखाविषयीं जें वैराग्य पाहिजे तें समाजसुखाविषयीं आसक्ति उत्पन्न व्हावी ह्मणून. स्वार्थत्याग जो करावयाचा तो परमार्थ बुद्धीनें जगदुद्धारार्थ यत्न करितां यावा ह्मणून. आचार्यांनीं साधनत्रयीनें जी ब्रह्मभावना सिद्ध केली आणि जें 'सर्वभूतात्मत्व' साधिलें, तीं लोककल्याणकार्यीं प्रत्यक्ष प्रकट होऊन सफल झाल्यावांचून राहणार नाहींत. ज्याला सारीं भूतें आत्मवत् दिसूं लागलीं, आणि ज्यानें महत्प्रयासानें मोठी सत्वसंपत्ति संपादिली त्या कृपाळू आचार्याला अज्ञान, दीन, लोकांचें कार्य आपलें करून घेतल्यावांचून कसें राहवेल? आणि पूर्व पुण्यामुळें ज्या समाजाला श्रीकृष्णासारखे ज्ञानसंपन्न आणि योगयुक्त आचार्य वाचेनें आणि कृपेनें मार्ग

दाखविण्याला मिळाले आहेत, आणि त्यांचा बोध समजून व त्यांवर अत्यंत निष्ठा ठेऊन उपदेशानुरूप अधिकारोचित कर्म दोहीं हातांनीं करण्यास ज्या ठिकाणीं समंजस समाज अर्जुनासारखा तत्पर आहे, त्या ठिकाणीं संपत्ति, यश, सामर्थ्य, ज्ञान आणि सदाचार, सदोदित नांदत राहील यांत तिलमात्र संदेह नाहीं.

ठराव ३२. योगशास्त्राचा अभ्यास मनुष्यमात्रानें करावा. तें प्राणाचें शास्त्र आहे, आणि प्राण-पोषण सर्व पराक्रमाचें आणि पुरुषार्थाचें मूळ आहे. ती संजीवनी विद्या आहे. ती सामर्थ्य वाढविणारी आणि अनुद्भूत गुण स्फुट करणारी विद्या आहे. मोठ्या काळजीनें आणि आदरानें तिचा अभ्यास करावा. **आदिनाथांनीं** लोककल्याणार्थ योगविद्या जगांस उपदेशिली आहे. तुमच्या समजुतीला आणि अभिरुचीला व तुमच्या संसाराला आणि सुखाला ती अनुकूल आहे. वस्तुतः सर्वसंगपरित्याग करणाऱ्या विरक्ताची ती विद्या नसून संसक्ताचीच ती आहे. ती तुह्मीं पुनः आपल्या हातीं घ्या. तिच्या योगानें आपलें ऐहिक आणि व्यावहारिक मनोरथ पुरवून घ्या, शक्ति वाढवून घ्या, असाध्य साधून घ्या, शत्रु जिंकून घ्या, शास्त्रें सर करून घ्या आणि संसाराचा उत्कर्ष करून घ्या. शरीरसिद्धिदायक योगासारखें दुसरें कांहींच नाहीं. आणि चित्तशुद्धि हें तर त्याचें मुख्य कार्य आहे. निरोग काया आणि पूर्णायुष्य तो देईल, सबल संतति तो देईल, हवें तें करण्याचें सामर्थ्य तो देईल, इंद्रियांचें बल वाढवून शंभरपट सुख तो देईल, मनोवृत्ति पुष्ट करून काबूंत आणील, बुद्धीचा प्रभाव वाढवील, इच्छेचें कर्तृत्व चढवील, मनाची मर्यादा मोडील, आणि सचेतन आणि अचेतन सृष्टीवर विजय मिळविण्यास समर्थ करील. येवढा योगाचा प्रभाव आहे. त्यांतील ज्याला जितकें साध्य असेल तितकें त्यानें अवश्य घ्यावें--त्यांत गुह्य असें कांहींच नाहीं आणि वेष्टनांत गुंडाळून त्यांत जो गूढपणा आणिला आहे, तो नाथपंथीयांनीं आपल्या ज्ञानाचा उथळपणा झांकण्याकरितां मुद्दाम आणिलेला आहे. घेणाराचा अधिकार सर्व ठिकाणीं आहे तसाच येथेंही आहे. परंतु थोडाबहुत अधिकार प्रत्येकास

आहे व तेवढ्याचा उपयोग करून मिळेल तेवढी योगसिद्धि मिळविल्यावांचून कोणीही राहूं नये. कवीनें जेथें रममाण व्हावें अशा वनश्रींच्या सुखावह दर्शनांत जसें प्रत्येकानें देहभान विसरून नित्य घटकाभर तल्लीन व्हावें, तसेंच शुचिर्भूत एकांत स्थानीं योगमार्गाचा प्रत्येक स्त्रीपुरुषानें अभ्यास करून एकांताच्या सुखाचाही आस्वाद घ्यावा. दिवसाचा जसा एके प्रकारचा आनंद आहे तसाच रात्रींचाही एके प्रकारचा आनंद आहे. लोकांतांत जसें एके प्रकारचें सुख आहे, तसेंच एकांतांतही एके प्रकारचें अवर्णनीय सुख आहे. तें कवीच्या आणि योग्याच्या उपदेशानें सर्वांनीं घ्यावें. अनुभव घेणाराला दोन्हीही ठिकाणीं सुख होतें इतकेंच नव्हे, तर त्याचें सामर्थ्य आणि सुखग्रहणाची पात्रता वाढत जाते. मात्र शून्य स्थिति आणि स्तब्धता आणि लय यांना बळी पडून साऱ्या मनोरथांचें, अंतःकरणाचें, आणि सत्वाचें, वाटोळें न व्हावें अशाविषयीं, या वाटेनें जातांना फार सावधपणा ठेवणें जरूर आहे. आपली जी इच्छा असेल, आणि आपल्याला जो गुण अथवा जी स्थिति साधावयाची असेल, तिचें एकाग्र चित्तानें दृढ चिंतन करावें ह्मणजे कार्यसिद्धि होऊन वरील अनर्थही टळेल. इष्टवस्तु प्राप्त होणें हा मोठाच लाभ होय; परंतु वस्तुप्राप्तीच्या कामीं लागणाऱ्या शक्तीचा लाभ होणें हा त्याहूनही मोठा लाभ होय. कारण एक सामर्थ्य आलें ह्मणजे त्याला हजार वस्तु आणून घेतां येतात. योगाभ्यासानें यशःप्राप्तीस पाहिजे असलेलें सामर्थ्य प्राप्त होईल, उल्हासाचें आणि शक्तीचें भरतें येईल आणि मनाचा विस्तार वाढेल. मनाला विश्वाएवढें मोठें आणि अणुएवढें लहान होतां येईल आणि स्वप्नांतदेखील ज्यांची कल्पना आली नव्हती, असले गुण असल्या कल्पना आणि असल्या शक्ती प्रत्यक्ष प्रगट होतील. दहा द्वारांनीं फांकणारें मन गुरूपदिष्ट मार्गानें एकवटून घेतलें असतां आंतल्या आंत अननुभूत असें शक्तिस्फुरण झाल्याचा अनुभव येईल. मन प्रकाशानें भरून जाईल आणि तेथील सर्व वस्तु स्पष्ट दिसूं लागतील. दुराग्रहाचें जाल उडून जाईल आणि नकोशा वाटणाऱ्या मनोवृत्तींचा जोर कमी करितां येईल. निर्वात स्थलीं ठेविलेल्या प्राण्याच्या शरीरांतील प्राणवायु जसा त्वचेचे बंद तोडून मोकळा होऊन मोठा होऊं

लागतो, त्याप्रमाणें मनांत एकांत केला असतां, आत्मवस्तु विस्तार पावते आणि तेजो-भक्षक हिऱ्याप्रमाणें अंधकारांत तेजाला प्रसवते आणि सारें चिदाकाश मनोहर व सप्रकाश करून सोडितें. गुणाच्या शोषणाला आणि पोषणाला ह्मणजे स्वभावाच्या सुधारणेला तर ही स्थिति अतिशय अनुकूल आहे. विषयांत विशेष प्रवेश होतो आणि कल्पनेला भरतें येतें. अभ्यास सुलभ होतो आणि बुद्धीचें तेज जलदीनें खुलूं लागतें. उत्कृष्ट मनोवृत्तींचें चिंतन या स्थितींत केल्यानें त्या दृढ होतात आणि पुष्ट होतात. सृष्टिसौंदर्याची जीं मनोहर रूपें जशीं पाहिलीं; तशीं सदा स्मरणांत रहावी असें वाटतें. त्यांचे स्मृतीच्या द्वारानें आवाहन केल्यास तीं मूळापेक्षां रमणीय दिसूं लागतात आणि कवीचें मन ज्यांत गुंतून पडतें असें सृष्टींतील सारे देखावे पूर्वीपेक्षां अधिक तल्लीन करून सोडितात. ज्ञानेंद्रियांचें सामर्थ्य वाढतें आणि सुखोपभोगाचें, संसाराचें आणि शास्त्रीय शोधाचें काम अधिक चांगल्या रीतीनें करितां येऊं लागतें. रमणीय सौंदर्य कळूं लागतें, सूक्ष्म संबंध दिसूं लागतात, आणि विरल विचार प्रत्यक्ष होतात. विजेनें भरल्यामुळें विद्युत्संचायक पात्रांत, धक्का मारून दूर सारण्याची जशी शक्ति उत्पन्न होते, तसेंच योगानें भारलेल्या अंतःकरणाचें प्रखर तेज, पाहणारास दुःसह होतें, आणि सर्वांस वश करितें. जी कल्पना, जो विषय, जो गुण आणि जी वृत्ति विकल्पें करून तुह्मीं मनांत आणाल आणि योग्य धारणा कराल, तो विषय, तो गुण, आणि ती वृत्ति, सजीव होईल, आणि सिद्ध केलेल्या मंत्राप्रमाणें अमोघ आणि अभीष्ट फलदायक होईल. ऐहिक सिद्धीच्या उद्देशानें—कारण ऐहिकाशीं विरोध करणारे पारमार्थिक निराळें कांहीं नाहीं—तुह्मीं योगाचा अभ्यास करावा आणि येथें आज जें तुह्मांला पाहिजे आहे, व ज्याकरितां तुह्मीं अनेक प्रकारची सामग्री गोळा करीत आहां, त्यांतच योगविद्या ह्या एका अमूल्य साधनाचा संग्रह करावा. साऱ्या जगांत योगशास्त्राची देणगी तुह्मां आर्यांस उदार हातानें दिलेली आहे, तिला सांभाळा आणि आपलें अद्वितीयत्व पुनः स्थापित करा. पदार्थशास्त्रांशीं आणि पदार्थसिद्धीशीं योगशास्त्राचा आणि योगसिद्धीचा उत्तम संयोग घडवून आणा आणि संसारिक, सामा-

जिक आणि राष्ट्रीय लाभाची यथेच्छ जोड करून कृतकार्य व्हा. योगशास्त्र हें सिद्धीचें शास्त्र आहे, संन्यासाचें नव्हे, किंबहुना बारकाईनें विचार केल्यास संन्यास देखील सिद्धीकरितांच आहे. येथलें मुख्य साधन कमी प्रयत्न अथवा अभ्यास आहे; शक्ति प्रमुख देवता आहे. भोग आणि ऐश्वर्य इष्टापत्ति आहे. येथें मोठा प्रयत्न, मोठा अभ्यास करावयाचा आहे; कर्माचा आणि कर्मसाधनांचा त्याग करावयाचा नाहीं; कारण योगाची सिद्धि प्रत्यक्ष आहे, भावरूप आहे; अभावरूप शून्यरूप नाहीं. निग्रह मात्र पाहिजे, मार्गाचें ज्ञान पाहिजे, गुरूची कृपा पाहिजे, ह्मणजे राजयोगाला अशक्य कांहींच नाहीं. मनुष्यमात्र साधकदशेंत आहे, त्यानें साधनाविषयीं विराग धरिल्यास सिद्धीही त्याजवर अनुराग करणार नाहींत. लक्ष वर्षें वांचेन, कोटिकर्में आचरीन आणि योगसाध्य अष्टसिद्धींच्या आठपट सिद्धि प्राप्त करून मनुष्याला जेथवर जातां येत असेल तेथवर जाईन, जें मिळवितां येत असेल तें मिळवीन, जें करितां येत असेल तें उन्नतीसाठीं करीन, शक्य असल्यास स्वर्ग काबीज करीन अथवा नसल्यास भूलोकालाच स्वर्गसम करीन, ज्ञेयाचा अंत पाहीन, पराक्रमाची सीमा गांठीन, आणि शेवटीं कल्पनेला अत्युत्तम अशी जी इष्ट स्थिति कल्पितां येत असेल, तीही साध्य करून नारायण होईन—असा तीव्र निश्चय प्रत्येकाच्या अंतःकरणांत सळसळूं लागला पाहिजे आणि यथाशक्ति कार्य भाग उरकीत आणि उरलेला जन्मांतरीं साधून घेण्याविषयीं दृढवासना धरीत, प्रत्येकानें जीवाच्या अति पवित्र, अत्यंत अभिमत कर्तव्यास आरंभ केला पाहिजे. असाध्य, अनिष्ट, आणि अज्ञेय कांहीं नाहीं; प्रयत्नानें आणि कालावधीनें सर्व साध्य आहे आणि ह्मणूनच तें साध्य करून घेणें हेंच मुख्य कर्तव्य आहे. आज अशक्यच राहील असें नाहीं आणि आज दुःखद आहे ह्मणून नेहमीं दुःखदायकच राहील असेंही नाहीं. तेव्हां आजच्या दुःखाला भिऊन जीवाचा, संसाराचा, प्रयत्नाचा आणि बुद्धीचा न्यास करणें अतिशय वेडेपणाचें आणि अदूरदृष्टीचें काम होय. सर्व प्रकारच्या प्रयत्नांनीं आणि साधनांनीं त्रिविध ताप दूर करून दुःखाची आत्यंतिक निवृत्ति आणि अपार सुखाची प्राप्ति व्हावी. संसार मंगलमय

व्हावा, शास्त्रांचा आणि ज्ञानसाधनांचा उत्कर्ष होऊन तत्वलाभ घडावा, आणि चित्शक्तीचें अपार स्फुरण होऊन सत्ता, सुख आणि सत्य यांचा जयजयकार व्हावा. अशी इच्छा आणि तसाच प्रयत्न असावा यांतच शहाणपण आहे. राजयोग हा कल्पवृक्ष होय; त्यांच्या छायेखालीं बसलेल्याला कशाचीही वाण पडणार नाहीं. अनुभव पहा म्हणजे सहज खात्री होईल. बाकीचीं शास्त्रें चांगलें व्हा, सज्ञान व्हा, सबल व्हा, म्हणून सांगतात आणि योगशास्त्र तसें कसें होतां येतें हें प्रत्यक्ष प्रमाणानें प्रत्येकाच्या अनुभवास आणून देतें; आणि म्हणून भाग्याची आणि सिद्धीची इच्छा करणाऱ्या प्रत्येक पुरुषानें आपले सर्व मनोरथ राजयोगाच्या साहाय्यानें सफल करून घ्यावे. शरीरांत रोगाचा प्रवेश होणार नाहीं, अकालीं जरा आणि मरण प्राप्त होणार नाहीं, सामर्थ्य भरपूर राहील, सहनशक्ति वाढेल, तेजस्विता येईल आणि याप्रमाणें कायासिद्धि होऊन चित्त, मन आणि बुद्धि यांच्या व्यापाराला शरीराचें जितकें साहाय्य पाहिजे तितकें मिळूं लागेल. धैर्य शांति, क्षमा, प्रेम, दया, आर्जव, इत्यादि इष्ट सद्गुण आणि सद्वृत्ति चित्तांत उत्पन्न होतील आणि वाढतील. पदार्थ आपले गुण धर्म सांगूं लागतील; औषधी आपण होऊन आपला प्रभाव कळवितील; तीनही कालांचें ज्ञान सुलभ होईल; भौतिक शक्ति वश होऊन सेवेंत तत्पर राहतील, शब्दाचें सामर्थ्य प्रकट होईल; अवकाश मुठींत येईल; आनंदमय कोश उघडतील; बुद्धि सर्वव्यापक होईल; खटाटोपावांचून आणि कोटिक्रमावांचून तत्वज्ञान अपरोक्ष रीतीनें होईल; अपरोक्षज्ञान होईपर्यंत कोटिक्रम उत्कृष्ट, सरळ आणि व्यापक रीतीनें चालवितां येईल, आणि शेवटीं जेथें राहून ब्रह्मांडाची घडामोड करितां येईल अशा सद्रूप, चिद्रूप आनंदरूप स्थितीचा लाभ होईल. मनाचें सर्व ऐश्वर्य खुलेल आणि आत्मोन्नतिरूप चिंतित कार्य तडीस जाईल. अनावर मनोवृत्तींना वश करून इच्छेप्रमाणें वागवितां येईल. व त्यामुळें बुद्धीच्या व्यवसायांतील व्यत्यय दूर होऊन तिचें सामर्थ्य फार वाढेल. या वृत्तिरूप बंधनांतून बुद्धिमुक्त झाल्यानंतर म्हणजे वृत्तीला स्वाधीन करून सेवेला लाविल्यानंतर तिचे डोळे खास उघडतील, ती

स्वयंप्रकाश होईल आणि तिच्या मुक्ततेबरोबरच माणसाला स्वातंत्र्य प्राप्त होईल. बुद्धिरूप आवरणाचाही ज्या कालीं भेद होईल त्या कालीं पदार्थ, शरीर, भौतिकशक्ति, मन, चित्त आणि बुद्धि या सर्वांवर आत्म्याचें प्रभुत्व कायम होईल आणि येवढ्या मोठ्या वशीकृत परिवारामुळें आत्म्याचा उत्कर्ष होईल. तेव्हां योगाभ्यास योग्यता वाढविणारा आहे; इतकेंच नव्हे तर आत्म्याला स्वातंत्र्याच्या दिव्य स्थितीचा ह्मणजे जींत सर्व जाणतां येतें आणि पाहिजे तें करितां येतें अशा स्थितीचा लाभ घडवून देणारा आहे. हें स्वातंत्र्य ह्मणजेच मोक्ष; कैवल्य पद तें हेंच. विस्मरणाच्या, काळोखाच्या, संकुचित, शून्य स्थितींत मनाची मोट बांधून त्यास ढकलून देणें मोक्ष नव्हे; तो नाश होय. या स्थितींत आत्म्याला विश्वायेवढें विस्तीर्ण होतां येतें. एका दृक्पातानें सारें पाहतां येतें, सहज सारें जाणतां येतें, आणि चित्तशक्ति इतकीं वाढतें कीं, तिच्या साहाय्यानें पाहिजे तें करितां येतें. मनाचें संशोधन करून मनासह आत्मेतर सर्व वस्तु आत्म्याच्या उपयोगार्थ आत्म्याच्या स्वाधीन व्हाव्या आणि त्यांचा यथास्थित उपयोग करितां यावा यासाठीं चित्तांत अपरिमितशक्ति उत्पन्न व्हावी, हे दोन योगशास्त्राचें मुख्य उद्देश होत. स्वतः च्या दुबळेपणामुळें उपाय करितात ह्मणून वृत्तीचा, जगाचा, आणि संसाराचा नाश करावयाचा नाहीं. तीं आत्मोन्नतीचीं अत्यंत उपयुक्त साधनें आहेत ह्मणून त्यांचें सामर्थ्य वाढवून आणि त्यांना पूर्णपणें वश करून त्यांच्या मदतीनें आपला कार्यभाग क्रमशः साधून घेतला पाहिजे. उद्धाराचा सामान्य जनास दुसरा मार्ग मोकळा नाहीं. परंतु आलीकडील खोट्या धर्मानें संसाराचा आणि परमार्थाचा विरोध पाडून एक साधवयाचें असल्यास दुसऱ्याला मुकलें पाहिजे असें ठरविलें आणि त्या धर्मश्रद्धेच्या विपरीत अतिरेकाच्या पायीं सर्वस्वाचा नाश होण्याची वेळ आली. वस्तुतः धर्म आणि व्यवहार यांचा अन्योन्याश्रय आहे व असला पाहिजे. पदार्थ आणि वृत्ति आणि सिद्धि कार्यांत विघ्नें आणितात ह्मणून त्यांचा उच्छेद केला आणि कार्यासह स्वतःची दुर्दशा करून घेतली. योग ह्मणजे चित्तवृत्तींचा निरोध, नाश नव्हे.

वृत्तींच्या आधीन राहिल्यावर त्या त्यांची तब्यत लागेल त्याप्रमाणें माणसाला वर्तवून त्याला भलतीकडे लोटून देतात, यांत संशय नाहीं; परंतु त्याच वृत्ति आपण चांगल्या वश केल्यानंतर किती तरी सुख देतात, किती सामर्थ्य वाढवितात, केवढें ऐश्वर्य देतात, ज्ञानप्राप्तीच्या किती उपयोगीं पडतात, आणि मुख्य आत्मकार्याला किती तरी साहाय्य करितात! येवढा राज–योगाचा प्रभाव असूनही त्यांतील तत्वांचा भलताच अर्थ केल्यामुळें आणि त्या अनर्थाला अनुसरून घातक प्रवृत्ति उत्पन्न झाल्यामुळें पतंजलीसारखे महायोगी जेथें निर्माण झाले त्या देशाची आणि तेथील समाजाची देखील सर्व बाजूंनीं किती शोचनीय आणि दीन स्थिति झाली आहे ती पहा? 'पातंजलदर्शना' चें यथार्थ ज्ञान होईल, त्या देशाला आणि त्या समाजाला सूर्यचंद्र कायम आहेत तोंपर्यंत कालाचें, अपयशाचें, आणि दैन्याचें, भय खचित खचित, बाळगावयास नको. योगशास्त्रानें उपदेशिलेल्या क्रिया यथाविधि आचरूं लागल्यानंतर, माणसाच्या साऱ्या गुप्त शक्ती उदय पावतील. सर्व शिक्षणांत योगाचें शिक्षण अत्यंत श्रेष्ठ आहे. त्याच्याच योगानें माणसाच्या जन्माचें सार्थक होतें; कारण त्याच्याच द्वारानें त्याच्या स्वभावाचें, गुणाचें आणि पराक्रमाचें सारें ऐश्वर्य प्रकट होतें, आणि त्या श्रेष्ठ शिक्षणाच्या अभावीं त्याच्या अंगचे किती तरी गुण अखेरपर्यंत झांकलेलेच राहतात. आणि कित्येक सुलभ असूनही दुर्लभ होतात. स्वभावाचें सारें ऐश्वर्य प्रकट न होणें ह्मणजे माणसाच्या आयुष्याची हानि होण्यासारखें, त्यानें अकालीं मरण्यासारखें होय. ही हानि परिहार्य आहे, आणि ह्मणून आपल्या प्राचीन योगशास्त्राचा गुरूच्या उपदेशानुसार आश्रय करून प्रत्येक भाग्येच्छूनें स्वतःला जितकें थोर, जितकें समर्थ, जितकें स्वतंत्र आणि जितकें सज्ञान होतां येईल, तितकें होण्याचा अवश्य प्रयत्न करावा. तुह्मीं या गुरुगुह्य मार्गानें चारच पावलें जाऊन पहा ह्मणजे तत्काल खात्री पटेल, आणि आणखी पुढें जाण्याविषयीं आपोआप उत्तेजन मिळेल. काळोखामुळें ज्या वस्तु एकेकाळीं मुळींच दिसत नव्हत्या; त्या सौम्य प्रकाशांत स्पष्ट दिसूं लागतील; हातीं गवसत नव्हत्या त्या तळहातावर घेऊन पारखितां येतील; लहानशा प्रसंगीं जो निश्चय <del>लटपत</del> होता, तो

अतिशय भयंकर प्रसंगावरही तुटून पडे ; उत्छृंखल मनोवृत्तींनीं जें काहूर उठवून दिलें होतें, तें धुक्यासारखें बुद्धिप्रकाशापुढें लोपून जाईल आणि रामसेवेंत वायुसुत जसा तत्पर त्याप्रमाणें साऱ्या चित्तवृत्ती बुद्धीच्या आज्ञेंत वागूं लागतील, येवढी शक्ति आणि येवढें स्वातंत्र्य लाभल्यावर दैवाधीन काय उरेल? दैवच स्वाधीन झाल्यानंतर दैवाधीन वस्तूही अनायासें स्वाधीन होतील. योग्यावर दैवाचा आणि प्रारब्धाचा अंमल चालत नाहीं दुनियेबरोबर दैवही त्याच्या आंकित होतें आणि प्रारब्ध त्याला शरण येतें. इच्छेप्रमाणें सर्व त्याच्या हस्तगत होईल; करील तें होईल; निश्चय मात्र खंबीर पाहिजे, आणि अभ्यास निरंतर चालू पाहिजे, ह्मणजे आज नाहीं उद्यां, या जन्मीं अथवा जन्मांतरीं, सिद्धि आणि भाग्य त्याच्या जवळ चालत येतील. प्रभूची अपार सत्ता आणि अतर्क्यज्ञान, विश्वांत आणि विशेषेंकरून माणसाच्या मनांत भरलेलें आहे. त्यानें मनाचा निश्चय केल्यास प्रयत्नानें त्याला तें प्राप्त होईल. भिऊं नका ; काम मोठ्या धैर्याचें आहे. भय धैर्याला चारून, धैर्याला पुष्टकरा आणि काळाशींही लीलेनें खेळावें अथवा ज्यानें प्रत्यक्ष काळालाही भेवडवावें असलें उद्दाम धारिष्ट्य संपादन करा आणि कसल्याही संकटाला भीक न घालतां ताठपणानें आणि निग्रहानें आपली वाट चालून जा. सिद्धि एका जन्मांत मिळणार नाहींत, ह्मणून तुमची काळाची अथवा आयुष्याची कल्पना कल्पांता पर्यंत लांबविलेली असूं द्या ; आणि धीर आणि धैर्य धरून इष्ट वस्तू मिळविल्यावांचून कधीं राहूं नका. पदार्थ, देह, कर्म, चित्त, बुद्धि, आणि आत्मा, या सहांच्या संबंधानें सहा प्रकारच्या सिद्धि आहेत. त्यांपैकी पहिली दुसरीला व दुसरी तिसरीला याप्रमाणें मागल्या पुढल्यांना प्राप्त करून देणाऱ्या आहेत. तेव्हां सर्वारिष्टांना टाळणारी आणि सर्वार्थाला देणारी जी आत्मसिद्धि तिचा लाभ व्हावा ह्मणून पूर्वींच्या सर्व सिद्धी अवश्य संपादन करा आणि काळाच्या उरावर चढून आपल्या स्वत्वाची ध्वजा उभारा, आपल्या प्रतापाच्या आविर्भावानें त्रिभुवनाला थरथर कांपवा, आणि साऱ्या जगताचे मनोरथ पुरवून त्यास सोन्याचे, अमृताचे, दिवस दाखवा.

समाप्त.

# शुद्धिपत्र.

## आचार्यपरिषद्.

| पृष्ट | पंक्ति | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ४ | ९ | दुसऱ्या | दुसऱ्याच्या |
| ,, | २८ | ध्यान | भान |
| ५ | २९ | पोहोंचविणें | पोहोंचविण्याचें |
| ६ | २२ | सत्तेच्या | सत्तेचा |
| ८ | ६ | दुरवस्थेबद्दल | दुरवस्थेबद्दल तुह्मी |
| ९ | ३ | सामाजिक | समायिक |
| १३ | ३ | सत्वाची | स्वत्वाची |
| १३ | ९ | देह | देह मिळून तुमचा देह |
| १४ | ४ | आकाश | आकाश, आकाश |
| १४ | १२ | अज्ञनांत कोणीही | अज्ञानांत कोणाही |
| १६ | ४ | सुशी | सुशि- |
| १६ | १६ | वाढवून | वाढवून घ्यावें |
| १७ | १९ | अवगण | अवगुण |
| २४ | १६ | तत्वासरखीच | तत्वासारखीच |
| २६ | १७ | वजन | यजन |
| २८ | ११ | व्यक्तिसमुदायाचें | व्यक्तिसमुदायाचा |
| ३२ | २० | आहेच | आहे |
| ३२ | २३ | योगी | भोगी |
| ३३ | १९ | सत्व | स्वत्व |
| ३६ | ४ | दुख : च्या | दु : खाच्या |
| ३७ | ६ | घरांत | घटांत |
| ३७ | १० | ज्यास | त्यास |
| ३९ | २६, २७ | उभ-उभयतांची | उभयतांची |
| ३९ | २९ | प्राय : चित्त | प्रायश्चित्त |

| | | | |
|---|---|---|---|
| ३९ | ४ | कर्म | कर्म, कर्म |
| ४४ | २६ | शास्त मूढ | शास्ते मूढ |
| ४५ | ७ | संपदावें | संपादावें |
| ४६ | २१ | तुमचें पण | तुमचेंपण |
| ४९ | ५ | मिदे | मिंधे |
| ५० | २४ | दरवर्षी | दरवर्षी त्यांच्या निमित्तानें विशेष प्रकारचे उत्सव करीत जावें, तसेंच |
| ५० | २५ | देवदयेमुळें | भूतदयेमुळें |
| ५१ | ३ | राष्ट्रपितरांचींही | राष्ट्रपितरांचेंही |
| ५३ | १० | सांडून लोकहित | सांडून आणि लोकहित |
| ५५ | ५ | सरदाच्या | सरदाराच्या |
| ५८ | २ | मळवावें | मवाळावें |
| ,, | १८ | येत नाहीं | येत नाहीं, असें नाहीं |
| ,, | २२ | करणाऱ्यास | करणाऱ्या |
| ,, | २६ | घडविणारा | घडविणारा, व पराक्रमाजोगे प्रसंग दाखविणारा |
| ५९ | २५ | दंग्याची | दग्याची |
| ६० | ४ | क्कश | क्लेश |
| ६१ | २।३ | येण्याजोगें आहे | येईल |
| ६२ | १३ | चिवटणा | जिवटपणा |
| ,, | १४ | भेद | मेद |
| ६४ | २९ | बुडविल्याखेरीज | बुडविण्याखेरीज |
| ६५ | ५ | सत्व | स्वत्व |
| ६६ | २३ | आहेत | आहांत |
| ६८ | २५ | असंयमनापासून | असंयम, यांपासून |
| ,, | २६ | परिणामीच्या | आणि परिणामीच्या |
| ७२ | ७ | धमोपदेश | धर्मोपदेशक |

| | | | |
|---|---|---|---|
| ७२ | ९ | नीतीनें | नीतीमुळें |
| ,, | २९ | अधर्म—व्यवहार | अधर्म—व्यवहार— |
| ,, | २९ | त्यामुळेंच | त्यामुळेंच प्रतीतीस येतें, आणि माणसाचें कल्याण त्यामुळेंच. |
| ७३ | ७ | सुख, ज्ञान | सुख, शांति, ज्ञान |
| ७४ | १९ | प्रमख | प्रमुख |
| ,, | २७ | कर्म कर्म | कर्म, कर्म |
| ७५ | ८ | करून | होऊन |
| ,, | १२ | आणि प्राणिमात्रावर | प्राणिमातावर |
| ७६ | २४ | अधवा | अथवा |
| ७७ | २४ | बाज | बाजू |
| ७८ | २८ | आचार्यांनीं | तथापि आचार्यांनीं |
| ७९ | ७ | सर्वांस | सर्वांस सर्व |
| ८० | ६ | तम | तप |
| ,, | ८ | श्री कृष्णपरमाम्यांनीं | श्री कृष्णपरमात्म्यांनीं |
| ,, | १३ | एकांनीं योगाभ्यास | योगाभ्यास |
| ,, | १८ | अल्पतृप्त | आत्मतृप्त |
| ,, | २९ | कृपेनें | क्रियेनें |
| ८१ | २७ | झाकण्याकरितां मुद्दाम | झाकण्याकरितां केलेल्या प्रयत्नामुळें आलेला आहे, व कांहीं लोकांची जिज्ञासा जागृत करण्याकरितां मुद्दाम |
| ८२ | १२ | सत्वाचें | स्वत्वाचें |
| ८३ | ८ | पाहिली; | पाहिली |
| ,, | ९ | वाटतें | वाटतें |
| ,, | २५ | योगविद्या ह्या | योगविद्येच्याही |

| | | | |
|---|---|---|---|
| ८४ | ४ | कर्मी | कर्म, |
| ,, | २४ | आज अशक्य | आज अशक्य आहे ह्मणून नेहमीं अशक्यच |
| ,, | २६ | बुद्धीचा | शुद्धीचा |
| ८५ | २८ | बुद्धिमुक्त | बुद्धि मुक्त |
| ,, | २९ | लाविल्यातंतर | लाविल्या नंतर |
| ८६ | १७ | उपाय | अपाय |
| ८७ | १० | ज्ञान होईल | ज्ञान होईल आणि तेणें करून सर्व वश होऊन शक्ति, स्वातंत्र्य, आणि ज्ञान, यांचा झालाच पाहिजे तेवढा जर लाभ घडेल तर |
| ८८ | १ | पडे ; | पडेल ; |
| ,, | २ | दिलें होतें, | दिलें होतें व त्याखालीं धन्यालाही दडपून टाकिलें होतें |
| ,, | ३ | तत्पर | तत्पर असे |
| ,, | ४ | वागूं लागतील, | वागूं लागतील आणि मनाच्या एका स्थितींत अशा एका गुप्त विद्युत्पेटिकेचें द्वार मोकळें होईल आणि तेथून भरारा इतक्या शक्तीचा संचार होईल कीं त्यामुळें साधकाला खरोखर धन्यता वाटल्यावांचून राहणार नाहीं ! |

---

# ग्रंथमाला.

## दरमहा पृष्ठें २००.

[ टपालच्या सोयीसाठीं १७२ पृष्ठांचे १४ अंक निघतील. ]

## वर्गणीचे दर.

सालीना रु० ६. टपाल हांशील ०८

सौलतीचा दर—दरमहा ५० रुपयांहून कमी उत्पन्न असलेल्या पुस्तकालयांस व सद्गृहस्थांस रु० ५ पडतील; ट० हां० निराळें.

या मासिकपुस्तकांत इतिहास, थोर पुरुषांचीं चरित्रें, प्रसिद्ध वक्त्यांचीं भाषणें, अनेक धर्मांतील व अनेक देशांतील सत्पुरुषांचीं उपदेशपर वाक्यें, भाषाशास्त्रीय टीपा, प्राचीनकालविषयक शोध, राजनीति, तत्त्वशास्त्र, अर्थशास्त्र, पदार्थविज्ञानादि सृष्टिशास्त्रें, कृषिशास्त्र, वैद्यक, पशुवैद्यक या व इतर विषयांवर लोकोपयोगी व सामान्य वाचकास समजण्याजोगे ग्रंथ व निबंध अवकाशानुसार येत जातील. ते भाषांतर, रूपांतर व कांहीं स्वतंत्रही असतील.

या शिवाय रा० रा० **विश्वनाथ काशीनाथ राजवाडे** बी. ए. यांनीं अलीकडे चार पांच वर्षें अनेक घराण्यांतील जुनीं जुनीं दप्तरें तपासून अमूल्य ऐतिहासिक लेख जमा केले आहेत. त्यांपैकीं ८० पृष्ठें दरमहा देण्याचें ठरविलें आहे. त्याजकडून या प्रकरणाचा २० वर्षें पुरवठा होईल, इतकी सामग्री त्यांजवळ आहे, असा त्यांचा अजमास आहे.

राजाराम कॉलेज, कोल्हापूर.

**विष्णु गोविंद विजापूरकर, एम्. ए.**
संपादक, ग्रंथमाला.